# पा ल क नी ती

पालकत्वाला वाहिलेले मासिक




संपादक
संजीवनी कुलकर्णी
संपादक मंडळ
- नीलिमा सहस्रबुध्दे
- वंदना कुलकर्णी
- प्रियंवदा बारभाई
- शुभदा जोशी

**मुखपृष्ठ :** 'निवांत'च्या सौजन्याने
**अंध कवी :** विजय साळुंके
**अंध चित्रकार :** उत्तम मरगज

**मुखपृष्ठ-मांडणी**
रमाकांत धनोकर

**अक्षरजुळणी**
मंगेश कुडले

**वार्षिक वर्गणी रु.२००**

वर्गणीचा चेक / ड्राफ्ट
**'पालकनीती परिवार'**
या नावाने काढावा.



संपर्क :
**पालकनीती परिवार,**
अमृता क्लिनिक,
संभाजी पूल कोपरा,
कर्वे रस्ता, पुणे - ४११००४.
© -०२०-२५४४१२३०,
२५६७३५९६
**palakneeti@gmail.com**
**www.palakneeti.org**



**पालकनीती परिवाराचे प्रकाशन**
**वर्ष १३ वे अंक ९ वा**
**१६ डिसेंबर २०१३**




## या अंकात



दिवाळी अंकामध्ये काही लेखांमध्ये झालेल्या चुकांबद्दल आम्ही दिलगीर आहोत.
त्यांची दुरुस्ती खालीलप्रमाणे:

१. वाचनाच्या वाटेवर, लेखक - गणेश विसपुते.
१.१ पान २९, परिच्छेद दुसरा
*स्वयंपाकघराच्या मध्यम उजेडात त्या कोपऱ्यात कशात तरी डोकं खुपसून मी बसलो आहे.*
**याऐवजी**
*स्वयंपाकघराच्या मद्धम उजेडात त्या कोपऱ्यात कशात तरी डोकं खुपसून मी बसलो आहे,*
**असे वाचावे.**

१.२ पान ३५, लेखाच्या शेवटी
*या व्यवस्थेत आता भारतासारख्या घनघोर विषमताग्रस्त समाजात विविध समाजसमूहातल्या मुलांना त्यांच्या जगण्याशी निगडित असं साहित्य निर्माण व्हायला हवं आहे. अशा साहित्यामुळे वेगळ्या वाटेनं, वेगळ्या प्रकारे जगणारे लोक जीवनाच्या परिघात येऊ शकतील. ह्या सगळ्या मांडणीमागचं तत्त्वं असं आहे की मूल बोलू चालू लागल्यावर...*
**याऐवजी**
*या व्यवस्थेत आता भारतासारख्या घनघोर विषमताग्रस्त समाजात विविध समाजसमूहातल्या मुलांना त्यांच्या जगण्याशी निगडित असं साहित्य निर्माण होणं गरजेचं आहे असं वाटतं. वेगळ्या वाटेनं, वेगळ्या परिस्थितीत जगणारे लोक परिघात येऊ शकतील, मुलांना आकर्षक वाटेल असं बालसाहित्य मुलांना मिळेल असं स्वप्न मी नेहमीच पाहत आलो आहे. सगळ्याचा तत्त्वग्रह असा की मूल बोलू चालू लागल्यावर...*
**असे वाचावे.**

२. चित्रभाषा..चिन्हभाषा,
लेखक - शलाका देशमुख
शलाकाताईंचा ईमेल चुकीचा छापला गेला होता. सुधारित ईमेल -
**shalaka.deshmkh@gmail.com**
(यात u नाही)

पान ७९ वरील चित्रांखालील चित्रकारांच्या नावांची अदलाबदल झालेली आहे.
योग्य नावे पुढीलप्रमाणे:



रशियन पुस्तकातील चित्र
पुस्तकाचे नाव : शूर मुंगळा,
लेखक-तात्याना मकारोवा,
चित्रकार-गेन्नादी पावलीशिन

इंग्रजी
पुस्तकातील
चित्र



नॉर्मन रॉकवेल यांच्या 'स्क्रापबुक फॉर ए यंग बॉय'मधून. चित्रकार-नॉर्मन रॉकवेल

दिवाळी अंकाच्या मुखपृष्ठाच्या चित्रकर्त्या रुची म्हसाणेने 'बालसाहित्यात' उच्चशिक्षण घेतले आहे, असा उल्लेख दिवाळी अंकाच्या संवादकीयामध्ये केलेला आहे.
रुचीने केंब्रिज स्कूल ऑफ आर्ट (यु. के.) येथून 'चिल्ड्रन्स बुक इलस्ट्रेशन' ह्या विषयात एम. ए. केलेले आहे. या अभ्यासक्रमामध्ये बाल-पुस्तकांमधील चित्रनिर्मिती हा मूळ कलाविषय असून, चित्रातील रंग, आकार, प्रमाण यांचा कथनातील / कथानकातील सहभाग, चित्र व शब्द यांचा मेळ, पुस्तकाची मांडणी, इत्यादि विषयांचाही समावेश होतो. या सर्व घटकांचा बालवाचकांवर होणारा एकत्रित परिणाम समजून घेऊन वाचनाच्या क्रियेला अधिक आनंददायी व अर्थपूर्ण बनविणे हे या विषयाचे उद्दिष्ट आहे.


संपादक, मुद्रक, प्रकाशक व मालक - डॉ. संजीवनी कुलकर्णी यांनी पालकनीती परिवार करिता ग्रीन ग्राफीक्स, सी-१०२, सुनिता अपार्टमेंट, १४१७ कसबा पेठ, पुणे-४११०११ येथे छापून घेऊन अमृता क्लिनिक, संभाजी पूल कोपरा, कर्वे रस्ता, पुणे-४११००४, येथे प्रकाशित केले.

# संवादकीय

सर्वात लहान कथा म्हणून अर्नेस्ट हेमिंग्वेची 'न वापरलेले तान्हुल्याचे बूट विक्रीला आहेत' ही सहा-अक्षरी कथा प्रसिद्ध आहे. माझ्या मनात या कथेशी एचआयव्हीच्या साथीचा काहीतरी शब्दांत मांडता न येण्याजोगा संबंध आहे.

एचआयव्ही नावाचा विषाणू शरीरात असलेल्या मातेकडून तिच्या बाळापर्यंत पोचू शकत असल्यानं, जन्मापासून किंवा त्यापाठोपाठ एचआयव्ही सोबतीला घेऊन आलेल्या तान्हुल्यांपैकी सुमारे वीस टक्के बाळं पहिल्या वर्षातच जगाचा निरोप घेतात. अनेकदा, त्यांना एचआयव्ही आहे, याचं निदानही तोपर्यंत झालेलं नसतं. मातेकडून बाळाला एचआयव्ही पोचू नाही यासाठी उत्तम औषधं उपलब्ध आहेत, त्याचा नेमका वापर करता आला, तर एचआयव्हीनं मरण्याची वेळ तान्हुल्यांवर अगदी क्वचितच येईल. एचआयव्ही असला तरीही जीवनाला सर्वांगांनी आणि सर्वार्थांनी सामोरं जाण्यासाठीही आता औषधं उपलब्ध आहेत. प्रतिबंधाची आणि उपचाराची अशा दोन्ही औषधप्रणाली असल्यानं, खरं म्हणजे आता एचआयव्हीला घाबरण्याची तशी काही गरज नाही. मात्र उपलब्ध असलेल्या गोष्टीपर्यंत न घाबरता पोचण्याची तयारी तेवढी हवी. ह्याची आठवण ह्या महिन्यात आवर्जून करण्याचं एक कारण , या महिन्यातल्या एक तारखेला जागतिक एड्स दिवस म्हटलं जातं, हे आहे; दुसरं कारण थोडं वेगळं आहे. काहीसं वैयक्तिकही आहे.

एचआयव्हीला न जुमानता, त्याच्यासह जगात जन्माला येऊनही, त्यावर औषधांनी मात करत जगणारी पहिली पिढी आता तरुण झालेली आहे. प्रयास या पालकनीतीच्या मित्रसंस्थेनं अशा बत्तीस मुलामुलींसोबत एक कार्यशाळा आयोजित केली होती. कार्यशाळा राहती होती. यातली पंचवीस मुलंमुली पहिल्यांदाच अशा कार्यशाळेला आलेली होती तर उरलेल्या सातांनी यापूर्वी अशा कार्यशाळेची चव चाखलेली होती. खरं म्हणजे, या सातांनीच प्रयासच्या आम्हा कार्यकर्त्यांच्या मागे लागून ह्या वर्षी ही कार्यशाळा आयोजित केली होती. कार्यशाळेच्या आधीचे चारपाच महिने ही मुलंमुली त्यासाठी कसून तयारी करत होती. या तयारीत काय नव्हतं? वाचन, गाणी, नाटकं, चर्चा, चित्रं, लेखन, अशा सगळ्या मार्गांनी त्यांचा अभ्यास चाललेला होता. बघणारे थकायचे पण दिवसभर काम करूनही ही मुलंमुली कंटाळत नसत. इतके अपरंपार कष्ट घेतल्यावर ती कार्यशाळा बेहतरीन व्हावी, यात नवल ते काय?

सुंदर आणि जबाबदार नातेसंबंधांपासून ते उत्कटपणानं रसपूर्ण जगणं, संवेदनशील प्रसन्नतेनं जीवनाला सामोरं जाणं इतकंच नाही तर सर्वस्पर्शी लैंगिकता आणि अर्थातच जीवनातून वजा न करता येणारा एचआयव्ही हे सगळे विषय आम्ही सगळ्यांनी पाच पूर्ण दिवस एकत्र बसून उलगडले. मुलंमुली ऐकत नाहीत, लक्षपूर्वक काही करतच नाहीत, असल्या कल्पनांना इथं थारा नव्हता, उलट पाच-पाच तास न कंटाळता जराही विचलित न होता समजावून घेतात, चकित करणाऱ्या शंका विचारतात. योग्य आणि अयोग्य यातल्या एरवी पुसट वाटणाऱ्या सीमारेषा नेमकेपणी चितारतात, आणि सर्वात महत्त्वाचं म्हणजे माणसाच्या जातीवर अतोनात प्रेम करतात; ह्याचा वस्तुपाठच या मुलामुलींनी आम्हाला दिला. वेगवेगळ्या आर्थिक सामाजिक स्तरातून ही मुलंमुली आलेली असूनही, ह्या सर्वांजवळ एकमेकांबद्दलची अत्यंत सहज आणि उत्फुल्ल मैत्रभावना होती. एकमेकांचा आत्मविश्वास जराही कचरू नये यासाठी प्रत्येकजण कमालीचा सजग होता. एक उदाहरण सांगते, कार्यशाळेतही आजारी असलेल्या, जवळचं असं कुणीही नसलेल्या आणि सुरवातीला न अडखळता चार शब्दही न बोलणाऱ्या एका मुलीची सर्वांनी इतकी काळजी घेतली, की शेवटच्या दिवशी तिनं एक सुंदर गाणं म्हणून दाखवलं. ते पाहताना 'अनेक प्रश्न असले तरीही, जीवन सुंदर आहे' या नव्या कथेचा साक्षात्कारच तिथे असलेल्या वयानं मोठ्या आम्हा मित्रमंडळींना झाला. निरोपाच्या वेळी ''आता आमची काळजी करू नका, यानंतर आम्ही औषधं चुकवणार नाही आणि नशिबाला दोष देत बसणार नाही,'' याची खात्री देणारी आणि पाच दिवसांचं एकत्रपण सोडून जाण्याच्या कल्पनेनं डोळे पाणावलेली ती अतोनात गोड मुलं पाहताना, हेमिंग्वेच्या सहा अक्षरी कथेचा एचआयव्हीशी जोडलेला नकोसा संदर्भ माझ्या मनातून पुसला गेला. त्याऐवजी या सर्वांनी त्यांच्या गटाला दिलेल्या 'सो व्हॉट' या दोन अक्षरी नावाचा आणि गायलेल्या गाण्यांचा सुगंध कधीही न विरण्यासाठी वस्तीला आला.

म्हणू साथीहो चला, तुम्ही-आम्ही एकसुरात, सो व्हॉट रे, सो व्हॉट रे!

**- संजीवनी**

पालकनीतीचा दिवाळी अंक अनेकांना खूप आवडला. अंक पाहिल्याबरोबर अनेकांनी कौतुकाचे फोन केले. सर्वांचेच मनापासून आभार! या अंकाच्या पाठोपाठ बालकुमार साहित्य संमेलन आणि बुकारू हा बालसाहित्य महोत्सव पुण्यात साजरा झाला. कार्यक्रम दोन्हीही चांगले पार पडले. बुकारूमध्ये मुलांनी आनंदानं वाचावं, चित्रं काढावी, काही हस्तकौशल्य वाढवावं, गोष्टी ऐकाव्या, असा वैविध्यपूर्ण प्रयत्न जास्त होता. मात्र तो आंतरदेशीय स्तरावरचा असल्यामुळे इंग्रजीभाषेत अधिकांशानं होता. इंग्रजी भाषेत उपलब्ध असलेलं बालसाहित्याचं विस्तृत अंगण पाहताना, आपल्याकडे त्याचं दुर्भिक्ष्य का, असा विचार अगदी साहजिकपणे मनात आला. असो. इंग्रजीचा जास्त प्रभाव असलेले का होईना पण असे प्रयत्न क्वचित होण्यापेक्षा वारंवार व्हायला हवेत. मराठीतही झाले तर बरंच!

**नम्र विनंती: पुढच्या पानावर असलेले वाचकांसाठीचे पत्र आठवणीने वाचा.**

प्रिय पालकनीतीचे वाचक,

स. न. वि. वि.

पालकनीती मासिकाची सुरवात १९८७ साली झाली, तेव्हा आपल्याला काही वर्षांनी हा उद्योग थांबवावा लागेल, अशी कल्पना मनात सततच धरलेली होती. आपल्या सर्वांच्या सहकार्यानं अशी वेळ आतापर्यंत आली नाही, पण आता ती आलेली आहे.

पालकनीतीची सुरवात झाली तेव्हा मराठी भाषेत या विषयावर पुरेशी पुस्तकं नव्हती, मासिक म्हणावं असं तर एकही नव्हतं. पालकत्व हा म्हटलं तर जिव्हाळ्याचा आणि तरीही दुर्लक्षित विषय. या विषयात आपल्याला माहीत नसलेलंही काही असू शकतं, याचीही फारशी जाणीव तेव्हा नसे. अशा काळात –पालकत्वाला वाहिलेलं मासिक –सुरू व्हायला हवं अशी कल्पना अनेकांच्या मनात तरळली असावी. पालकत्व हा विषय सार्वत्रिक संवादाचा व्हावा म्हणजेच त्याबद्दलचा विचार पुढं जाऊ लागेल या विचारानं संजीवनी कुलकर्णीनं पालकनीती या मासिकपत्राची सुरवात केली. एकटीनं मासिक चालवत रहायचं नाही, तसं झालं तर त्या सगळ्याच प्रयत्नाला एकेरीपणा येतो असं तिचं सुरवातीपासूनच म्हणणं होतं.

याच विचारानं १९९६ साली 'पालकनीती परिवार' ह्या न्यासाची स्थापना झाली. पुढे शुभदा जोशी या मैत्रिणीनं पुढाकार घेऊन पालकनीतीचं खेळघर हे वस्तीतल्या मुलांसाठीचं बालरंजनशिक्षण केंद्र तसंच नीलिमा सहस्रबुद्धेनं आणखी काही मित्रमंडळींसमवेत संदर्भ नावाचं द्वैमासिकही सुरू केलं. ही दोन्ही कामं आता आपापल्या आवाक्यानं वाढलेली आहेत.

२००७ साली पालकनीतीला महाराष्ट्र फाउंडेशनचा पुरस्कारही मिळाला. या गोष्टीचा उल्लेख आज करतो आहोत, कारण ह्या विषयाला आता मिळू लागलेल्या अग्रक्रमाचा हा एक पुरावाच आहे. पालकनीतीशिवाय अनेक मासिकं, शिक्षण–पालकत्व या विषयावर आता सुरू झालेली आहेत. अर्थात तरीही पालकनीतीची एक विशेष जागा आहे, महत्त्व आहे, याची कल्पना आम्हाला आहे. तरीही सुरू झालेली प्रत्येकच गोष्ट कधी ना कधी संपणार असते, थांबणार असते, हेही खरंच. पालकनीती हे मासिक थांबवण्याचा निर्णय आता आम्ही घेत आहोत.

अर्थात, मासिक थांबवलं तरी न्यासाची इतर कामं थांबणार नाहीत. खेळघर उत्साहानं बहरत आहे, आणि या दिवाळी अंकात विचारात घेतलेला बालसाहित्याचा विषय पुढे नेण्याचा विचारही मनात आकारतो आहे. पण मासिकासारखी गोष्ट अशी थांबवा, म्हणून लगेच थांबवायची नसते. थांबवता येतही नाही. आपल्याशी हे मनोगत व्यक्त केल्यानंतर पुढचं वर्षभर पालकनीती सुरूच राहणार आहे. याशिवाय अनेक जबाबदाऱ्या आहेत, असतातच. काम संपवण्यापूर्वी सर्व हिशोब पूर्ण करावे लागतील, आजीव वर्गणीदारांच्या पैशांच्या परतीची तजवीज नियमांनुसार करावी लागेल. तसंच जानेवारी २०१४ पासून नवीन वर्गण्या घेतल्या जाणार नाहीत. मुख्य म्हणजे अनेकांच्या –का–ह्या साहजिक प्रश्नाला तोंड द्यावं लागेल.

हा निर्णय घेण्याचं ठरवल्यावर काही सुहृदांशी बोलणं झालं. आम्ही हा निर्णय आत्ता का घेतला, असा प्रश्न त्या सर्वांनी विचारला. आता हे पत्र हाती पडल्यावर वाचकही विचारतील. त्याचं समाधानकारक उत्तर आम्हाला देता येईलच की नाही, हे सांगता येत नाही.

सुरवातीला संजीवनीनं एकटीनं काही काळ संपादन आणि सगळ्याच जबाबदाऱ्या निभावल्या; नंतर या कामात अनेक साथी सहभागी झाले. एक गट तयार झाला. तसा झाल्यावरच न्यासाची स्थापना झाली. मात्र या कामाला पूर्णवेळच्या कामाचं स्वरूप न देता गरज पडेल तेवढं काम यातले सर्वजण करत राहिले. आर्थिक अपेक्षा कुणीही कधीच केल्या नाहीत. गेल्या सत्तावीस वर्षात अनेक गोष्टी बदलल्या, काम करणाऱ्यांच्या जीवनात अनेक स्थित्यंतरं आली. तेव्हा कधी ना कधी थांबणं हे आवश्यकच होतं.

आणि म्हणून आम्ही सर्वांनी आता एकमतानं ठरवलं आहे, की पुढचं वर्ष आपण सर्वजण आणखी नव्या उत्साहानं उत्तम अंक करू. ते अठ्ठाविसावं वर्ष असेल. मग मात्र आत्ता काम करणारी माणसं अंकाचं काम करणं थांबवतील.

पालकनीती हा विचार मासिकापुरता मर्यादित नाही, तेव्हा न्यास थांबणार नाही, कदाचित इतर काही नवे प्रकल्प सुरू करता येतील, या विषयात काम करणाऱ्या इतर संस्थांसोबत अधिक जोडून घेता येईल.

थांबण्यामागचं एक महत्त्वाचं कारण, ही जबाबदारी घ्यायला नव्या पिढीतलं कुणी पुढे आलेलं नाही असंही आहे. पण समजा, हे पत्र समोर आल्यावर कुणाला पालकनीती चालू ठेवण्याची सक्षम सबळ इच्छा असेल, या विषयात रस असेल तर त्यांनी जरूर पुढे यावं, त्याला आमची ना तर अजिबात असणार नाही, उलट मनापासून स्वागतच असेल.

आपल्या सर्वांच्या सहकार्याबद्दल पुन्हा एकवार मनापासून आभार मानून पत्र संपवत आहोत.

आपले नम्र

पालकनीती संपादक मंडळ





लेखांक-८






# जीवन सुंदर आहे याची अनुभूती देणारं 'निवांत'

**मीरा बडवे**

**दिवाळीच्या आधी आम्ही 'निवांत' संस्थेला भेट द्यायला गेलो होतो. 'अंधांसाठीची संस्था' म्हणून प्रचलित असणाऱ्या प्रतिमेला पूर्णपणे छेद देणाऱ्या तिथल्या चैतन्यशील आणि आपुलकीच्या वातावरणानं आम्हाला पहिल्या भेटीतच आपलंसं केलं. मुलांचा मुक्त आणि आत्मविश्वासपूर्ण वावर – कोणी संगणकावर काम करतंय, तर कोणी चॉकलेट बनवतंय, कोणी जिन्यातच एका कोपऱ्यात आपल्या संगणकावरच्या कामात पूर्ण व्यग्र. चहा –नाश्त्याच्या वेळचे हास्य–विनोद, एकमेकांच्या नकला, शाब्दिक कोट्या, रीडरच्या भूमिकेच्या पलीकडे जाऊन अंध मुलांशी मैत्रीचा सेतू बांधण्याच्या हेतूनं आलेला डोळस मुलांचा गट, 'व्हिजन अनलिमिटेड' या ग्रंथालयात पुस्तकं 'वाचत' बसलेली मुलं...हे सारं शांतपणानं न्याहाळणं हाही एक अनुभव होता. हे आगळं–वेगळं, आश्वासक जग उभं केलंय मीराताई बडवे यांनी. आपल्या वैयक्तिक आणि सामाजिक पालकत्वाच्या वाटचालीचा त्यांनी घेतलेला हा मनमोकळा वेध.**

ज्याची आतुरतेनं–अधीरतेनं वाट पाहत होते, तो मातृत्वाचा क्षण लग्नानंतर तब्बल सात वर्षांनी आला. त्याचवेळी जन्मल्या–जन्मल्याच लेकीनं बोट घट्ट धरून ठेवलं म्हणून बापाच्या चेहऱ्यावर ओसंडून जाणारा अभिमान पाहिला. फार स्वप्नं पाहिली होती मी पालकत्वाची. मला आयुष्यात जे करणं जमलं नाही ते सारं माझ्या सोनपरीनं – उमानं करावं वाटायला लागलं. तिच्या भोवती माझं सारं–सारं आयुष्य गुंफून गेलं. तिचं शिक्षण, गाणं, पोहणं, ड्रॉईंग शिकणं, कराटे–साऱ्या चक्रात मायलेकी गरागरा फिरत राहिलो. त्यातच सगळ्या स्पर्धांमध्ये तिला उतरवणं आणि सारी लगबग माझ्यातल्या पालकाला सुखावत गेली....पण उमातल्या बालकाला मात्र काय वाटलं हे विचारणं राहूनच गेलं. मागे वळून बघताना वाटतं– पुन्हा जर उमाचं 'बालपण' जगता आलं तर फार 'निवांत'पणे जगू दोघीजणी. अपेक्षांचा भारा शिरावर न वाहता निखळ आनंदात धावू–खेळू–बागडू. स्पर्धांच्या जगात शिरून 'पालकत्व' नासवणार नाही आणि 'बालपण' हरवणारही नाही.

माझ्यातला 'पालक' महत्त्वाकांक्षी असला तरी घरातलं हे माझं 'बालक' मोठं शहाणं होतं. ड्रॉईंगचे सर फार मोठ्यानं बोलायचे. उमानं सांगितलं – ''आई, ड्रॉईंग छान शिकेन एखादेवेळी, पण बहिरीही होईन.' ड्रॉईंगचं ओझं' हलकं झालं. क्लास बंद पडला. असंच एक क्षणचित्र फार प्रकर्षानं आठवतंय. साडेचार वर्षांची उमा एकदा कराटे क्लासमधून धावत येऊन मला बिलगली. म्हणाली, ''आई, मी स्विमिंग करेन नाहीतर कराटे. दोन्हीपैकी एकच करेन. मला दोन्ही दोन्ही करताना टेन्शन येतं.'' तिनं पोहावं असं ठरल्यावर स्पर्धा–शाळा–कोचिंगच्या कचाट्यात सापडत गेली. सकाळी लवकर उठून ती अन् मी स्कूटरवर स्वार होत किंवा बसला लोंबकळत स्विमिंग टँकवर पोचायचो. अभ्यासाचाही तिला बराच ताण यायचा.

आधी 'सेंट मेरीज' या श्रीमंत मुलांच्या शाळेत उमाला घातलं खरं पण तिथली संस्कृती पटेना. के. जी. नंतर जिल्हा परिषदेत खूप खेटे घालून नगरवाला शाळेत घातलं. या शाळेत समाजातली सर्व स्तरातली मुलं होती. उमातल्या कलागुणांना गांधीवादी नगरवाला सर आणि उदारमतवादी दलाल मॅडम यांनी खूप प्रोत्साहन दिलं. स्वतंत्र विचार करायला, निर्णय घ्यायला शिकवलं.

### उशिरा उमगलं ...

एक आठवण मनाच्या तळाशी खोलवर रुतलीय. अनेक अप्रगल्भ पालकांसारखी मीही पहिली–दुसरीत एक–दोन मार्कांसाठी लढायला शाळेत जायची. एकदा दलालमॅडम म्हणाल्या, ''तुझी मुलगी फार गुणी आहे. कशाला इतकं प्रेशर देतेस तिला? परत येऊ नकोस शाळेत असल्या फालतू कारणांसाठी.'' क्षणभर इगो दुखावला... पण इवल्याशा चिमणीवर स्वत:ची स्वप्नं लादल्याची आतून खंत वाटली.

या प्रसंगानंतर मात्र फार अंतर्मुख होऊन विचार केला. उमातलं गुंतणं संपलं नाही तरी तिच्यात जरुरीपेक्षा जास्त अडकणं संपलं. तिच्या मागे लागणं संपलं. तिची मेडल्स आणि ट्रॉफीज् बघून खुळावणंही संपलं. हळूहळू या साऱ्या स्पर्धेचा फोलपणा समजला. गाणं शिकवायला संजोगसर यायचे. सहा महिने ते फक्त भातुकली खेळून निघून जायचे. तेव्हा त्यांचा फार राग यायचा. पण त्यांनी उमाच्या कलानं तिच्याशी दोस्ती

करत, तिचं भावविश्व समजावून घेत तिला हार्मोनियम आणि गाणं शिकवलं. शाहू टँकवरचे 'शाहू' सर मुलांना त्रास देणाऱ्या पालकांना फार फार रागवायचे. मुलांची पाण्याशी दोस्ती होईपर्यंत आणि नंतरही त्यांना कधी रागवायचे नाहीत. पालक मात्र मुलांना रेसच्या घोड्यासारखे वागवायचे. वेळेवर फिनिश पॉईंटला हात लावला नाही तर बुटाखाली बोटं चिरडायचे, पट्ट्यानंही मारायचे. इथे फसलेलं, गंडलेलं पालकत्व पहायला मिळालं.

हळूहळू माझ्यातलं 'पालकपण' प्रगल्भ झालं. आणि उमाला माणूस म्हणून बहरताना पाहता आलं. शाळेतल्या मुक्त वातावरणात ती खूप मनमुराद खेळली-बागडली, सर्व उपक्रमात भाग घेत राहिली. इथल्या मित्र-मैत्रिणींत मनापासून रमली.

### जीवनाला कलाटणी

सर्वसामान्यांपेक्षा माझ्या आयुष्यात वेगळं घडण्याचा योग होता. सतरा वर्षांपूर्वी, उमा नववीत असताना - एक दिवस सहज म्हणाली, ''ममा, तू काहीतर कर - स्वत:साठी जग आता. घराबाहेर पड. तुझं सगळं ज्ञान वाया जातंय.'' लक्षात आलं- आपली चिमुरडीच आपली पालक झालीय. घराबाहेर पडायचं, पण करायचं काय? उमाच्या जन्मानंतर शाळेतलं शिकवणं बंद केलं होतं. आता परत नवा डाव-नवा पट मांडायचा होता. कॉलेजमध्ये इंग्रजी शिकवायचा निर्णय घेतला. माझा नवरा आनंद कित्येक वर्षं स्वत:च्या वाढदिवसाला रक्तदान करायचा, अंधशाळेला डोनेशन द्यायचा. वाटलं, एकदा परत नोकरीत गुंतलो की आनंदबरोबर अंधशाळेत जाता येणार नाही . 'अगदी पैसे नव्हते तेव्हाही आनंद अंधशाळेला का बरं पैसे द्यायचा?' इतकंच कुतूहल मला अंधशाळेच्या दारात घेऊन गेलं. तोपर्यंत स्वप्नातही कधी वाटलं नव्हतं की मी पुढलं आयुष्यभर एक जगावेगळं 'पालकपण' स्वीकारणार आहे.

अंधशाळेत सहज एका जिन्यापाशी उभी होते. अडीच-तीन वर्षांच्या चिमण्या मुलांची रांग धडपडत जिना चढताना पाहिली. विचारात गढले होते, तेवढ्यात एक चिमणं येऊन धडकलं मला. मला मिठी मारून रडायला लागलं. मी आई वाटले त्याला त्याची. माझं मन हेलावून गेलं. त्या मिठीत विरघळलेल्या क्षणी नवीनच 'पालकपण' जन्माला आलं. कुठली नोकरी अन् काय? या चिमण्यांसाठीच काहीतरी करायचं ठरवलं. शाळेत रोज जात राहिले. नव-नवे शैक्षणिक प्रयोग करत राहिले. ब्रेल शिकले. मुलांबरोबर क्रिकेटही खेळले. नाटकं बसवली, त्यांच्यात गुंतत गेले. त्यांची खास जवळची मैत्रीणही झाले.

आठवीनंतर मात्र पोरांना शिंगं फुटली. कळलं-यांच्यात आणि डोळस मुलांत काहीच फरक नसतो. ही जशी प्रेमळ, हुशार, चुणचुणीत, प्रामाणिक, कष्टाळू मुलं आहेत तशीच यातली काही लबाड, माकडचेष्टा करणारी, चोऱ्या, कॉपी करणारी, अंधत्वाचा गैरफायदा घेणारी, अभ्यास न करणारी, व्यसनं करणारीही मुलं आहेत. आपल्या कल्पनेतल्या अंधत्वाचा तर इथे मागमूसही दिसत नाही. विनामूल्य सेवेचं मूल्य यांना कळत नाही. वाटलं-संपलं सारं, हरलो आपण. सोडून दिलं शाळेला जाणं. हरलं-माझ्यातलं पालकपण हरलं.

### 'निवांत'चा जन्म

सिद्धार्थ गायकवाड - सिद्धा, बंडगार्डनच्या फूटपाथवर अन्न-पाण्याविना राहिलेला सिद्धा 'निवांत' सदनी म्हणजे आमच्या बंगल्यावर घर शोधत आला. धापा टाकणारा हाडांचा सापळा. घरात घेतला, त्याला धुतलं, पुसलं-न्हाऊ-माखू-खाऊ-पिऊ घातलं. टॉयलेट ट्रेनिंगपासून सारं 'पालकत्व' आलं. हाच खरं तर 'निवांत'चा जन्मक्षण!

सिद्धाबरोबर काम करता करता या मुलांचं जग, त्यांच्या समस्या उलगडत गेल्या. शालेय स्तरावर, निवासी अंधशाळांतून त्यांच्या अन्न-





वस्त्र-निवारा या गरजा भागतात. काही अंशी शिक्षणही मिळतं. पण पुढं काय? समाज-कल्याणच्या कायद्यानुसार अठरा वर्षांपर्यंतच ही मुलं तिथं राहू शकतात. नंतर त्यांना 'स्वतंत्र' जगायला सोडून दिलं जातं. परतायला घरटं नसतं. आईवडिलांच्या धूळभरल्या आयुष्याला अंध मूल पेलवत नाही. अनेकदा तर जन्मल्या-जन्मल्याच त्याला सोडून दिलं जातं. सनाथ असूनही ही मुलं अनाथ बनतात. कोणीतरी काका-मामा या मुलाला अंधशाळेत सोडतो. जन्मदाखला असतो-नसतो. कधी कधी मूल दहाव्या वर्षी शाळेत दाखल होतं. अठरा वर्ष ही सापेक्षच कल्पना! सातवी-आठवी-कितवीतही... हे मूल रस्त्यावर

येतं. स्वतंत्रपणे जगता येईल अशी कोणतीच कौशल्यं त्याच्याजवळ नसतात. खडू, मेणबत्त्या बनवणं, वेताच्या खुर्च्या विणणं अशी काही कामं या मुलांना येतात खरी. पण अर्थार्जन करून, कुटुंबाचं पालनपोषण करता येईल असं त्यांच्याजवळ काहीही नसतं. घरच्यांना ही मुलं अनुत्पादक वाटल्यामुळे नको असतात. तसंच समाजालाही ही मुलं भार वाटत असतात. परतीला घरटं नाही आणि समाजात स्थान नाही. 'अंधार मनात, अंधार बाहेर' अशा अवस्थेतली दिशाहीन मुलं समाज सहजपणे वाममार्गाला लावू शकतो, मुलं व मुली वेगवेगळ्या कारणांसाठी





वापरताना दिसतो. हे फार हृदयविदारक चित्र आहे.

**निवांत अंध मुक्त विकासालय**

या मुलांना बुद्धी नसते का? चांगलं आयुष्य जगावंसं वाटत नसतं का? पण त्यांनी चांगल्या आयुष्याची स्वप्नं पाहिली तरी ती पूर्ण कशी होणार? रस्त्यावरची ही मुलं माझ्या आयुष्यात आली. सिद्धासाठी उघडलेलं दार, शेकडो 'विशेष दृष्टीच्या' उच्च शिक्षण घेऊ इच्छिणाऱ्या मुलांसाठी सदासाठीच उघडं झालं. घर मुलांनी गजबजून गेलं. त्यांचे प्रश्न माझे झाले. घरातच 'निवांत अंध मुक्तविकासालय' सुरू झालं. अगदी कळत-नकळत.

काय आहे 'निवांत'चं वेगळेपण? शाळा संपली की शिक्षण संपलं अशीच अंधक्षेत्राची अवस्था होती. दहावीनंतरच्या मुलांसाठी एकही अक्षर ब्रेलमध्ये उपलब्ध नव्हतं. श्रीमंत अन् घरून आधार मिळणारी मूठभर मुलं शिकायची पण बाकीच्यांचं काय? अभ्यासक्रम डोळसांचा...शैक्षणिक सुविधा शून्य! हा काय सामाजिक न्याय आहे?

काय होतं माझ्या हाताशी तेव्हा? स्वत:चं घर, आयुष्य, शैक्षणिक पार्श्वभूमी, शिक्षण क्षेत्रात केलेलं काम एवढीच पुंजी होती. दहावीला विज्ञान, गणित यासारखे विषय असतात, ते मुलांना शिकवायचे होते. मग घरातलीच साधनं वापरून घरगुती प्रयोगशाळा उभारली. ध्वनीची कंपनं शिकवताना पेन्सिल आणि बोटांचा वापर, कधी चिमटा, कधी घंटा, ताम्हण, बरण्या असं वापरत विज्ञानाचे प्रयोग केले. सिद्धाला विज्ञानात बरे मार्क पडले. गणित सोडूनच मला स्वत:लाच तीस वर्षं उलटली होती. आनंद-माझा नवरा, त्याच्याकडून रोजचा विषय शिकून घ्यावा लागायचा. सिद्धार्थ पास झाला. अंधांच्या स्वतंत्र आकाशवाणीला कळलं, 'मॅडम खड्ड्यातून बाहेर काढू शकतात'. शेकडो मुलं यायला लागली, स्वत:हून शोधत.

शिक्षणाबरोबरच आईपणही स्वीकारावं लागलं. स्वच्छतेचे, शिस्तीचे धडे देताना दमछाक झाली. गळकी नाकं पुसायला रुमाल देणं, टॉयलेट ट्रेनिंग देणं, मुलींच्या दैनंदिन गरजेच्या वस्तूंबरोबर केसात येणाऱ्या प्राण्यांसाठी 'ऊना' देणं, सर्व लेकरांना मापाचे व्यवस्थित शिवलेले कपडे देणं; शिवाय कॉलेजमध्ये त्यांना इतर मित्रांनी दूर करू नये आणि या मंडळींनी समाजाचा अविभाज्य भाग व्हावं म्हणून विविध प्रकारचे प्रयत्न करावे लागले. कित्येकांनी प्रत्यक्ष जीवनात मायेचा स्पर्शच कधी अनुभवला नव्हता. याच्या अगदी उलट काही जणांना आईनं 'आंधळं लेकरू' म्हणून अत्यंत फालतू लाड करून स्वतंत्र होऊच दिलेलं नव्हतं. हे तर अधिकच अपंग मूल असायचं. आई नसणाऱ्यांची आई होणं आणि आई असणाऱ्यांच्या आईला त्यांना समर्थ व्हायला मदत करायला सांगणं, असं हे विलक्षण युद्ध होतं. अंध मुलांना अनेकदा खूप विचित्र सवयी असतात. मान खाली घालून तिरकी करून बोलणं, डोळ्यात बोट घालणं, मान सतत हलवणं, डोळे ताणून बोलणं, या सवयी घालवून त्यांच्यातून एक स्वस्थ-चित्त व्यक्तिमत्त्व निर्माण करण्यासाठी त्यांच्याबरोबर अनेक तास आईपण घेऊन घालवावे लागतात. तरच 'अंधाराचं मानसशास्त्र' आपल्याला कळू शकतं.

या मुलांकडून गुणवत्ता असणारं काम करून घ्यायचं, तर आधी त्यांच्या अन्नपाण्याची व्यवस्था करणं गरजेचं होतं. कुपोषित वा भुकेलं मूल अभ्यासात कसं लक्ष देणार? या मुलांच्या डोळ्यांच्या, दातांच्या, रक्ताच्या व इतर शारीरिक तपासण्या करून त्यांना असणाऱ्या आजारातून त्यांना मुक्त करणंही तितकंच आवश्यक होतं.

भरल्यापोटी, स्वस्थ शरीर असलेलं मूल दिसायला लागलं की मग दुसऱ्या पायरीवर त्याच्या शैक्षणिक गरजा आणि आवडीनिवडी हा प्रवास सुरू होतो. एरवी अन्न, वस्त्र, निवारा याची लढाईच इतकी तीव्र असते की बाकी माणूस म्हणून जगता यावं हे कसं वाटणार?

उमाची आई होताना केलेल्या चुका या मुलांची मीरामाय घडताना

उपयोगी पडल्या. अंधशाळेतल्या कामातूनही बरंच शिकायला मिळालं होतं. असं हे दुहेरी मातृत्व काम करता करता समृद्ध होत गेलं. आता अपेक्षांचं ओझं कमी होतं, सहनशीलता वाढलेली होती. सहानुभूतीच्या भारानं ते वाकलेलंही नव्हतं. शिक्षणव्यवस्था, समाजव्यवस्था यांच्याशी लढण्याचं बळ आलेलं होतं. शिक्षण देणं ही प्रक्रिया तरी सोपी कुठं असते? सर्वात गहन प्रश्न होता तो शिक्षणसंस्था-प्रमुखांना विश्वास देण्याचा. आपण शिकतो ते ते सर्व काही ही मुलं शिकू शकतात. त्यांना भेटून, हे सगळं सांगून पटवून मुलांचा संपूर्ण शैक्षणिक व आर्थिक भार उचलण्याचं वचन दिलं तरी भुवया अनेकदा उंचावलेल्या असायच्या. जेव्हा या विद्यार्थ्यांना व्यवस्थांमध्ये व्यवस्थित शैक्षणिक मार्गदर्शन दिलं गेलं तेव्हा ही मुलं त्यांच्या-त्यांच्या शिक्षणशाखांमध्ये प्रथमही आली, आजही येतात.

दहावीनंतर एकही अक्षर ब्रेलमध्ये उपलब्ध नसताना हा प्रवास सुरू झाला. हातानं पुस्तकं लिहीत लिहीत मुलांच्या कल्पनेतूनच 'ब्रेल लायब्ररी' उभी राहिली. क्रमिक पुस्तकं तरी कुठे होती? एकाच टेबलवर बारावीचं अर्थशास्त्र, एफ. वाय, बी. ए.चं मानसशास्त्र, टी. वाय. बी. ए.चं राज्यशास्त्र आणि अकरावी इंग्रजी शिकणारी मुलं माझ्याशी जुळवून घेत नोटस् घेत असायची. अभ्यासेतर पुस्तकांसाठी रात्री मुलं 'निवांत'ला राहायची. घसा सुजेपर्यंत आणि डोक्याचा भुगा होईपर्यंत केलेल्या दिवसभराच्या कामानंतर रात्री ब्रेलमध्ये दर्जेदार साहित्यनिर्मिती करण्यासाठी लढावं लागायचं. मुलांची बोटं ब्रेल लिहून सुजायची, त्यांना ताप यायचा... पण त्यांची जिद्द अफाट होती. नंतरचा लढा प्रूफरीडिंगचा असायचा. ब्रेल चुका दुरुस्त कशा करणार? ब्रेल उर्दूसारखं उजवीकडून डावीकडे लिहिलं जातं आणि डावीकडून उजवीकडे वाचलं जातं. टिंब खोडणं वा दुरुस्त करणं अशक्यच होतं. मग मात्र शक्कल लढवून चुकांवर बरोबर शब्दांच्या चिठ्ठ्या लावायला लागलो. मुलांनी २५० ब्रेल पुस्तकं लिहिली.

**वाचनाची गोडी लागावी म्हणून**

या मुलांमध्ये वाचनाची गोडी वाढविण्यासाठी नवनवीन उपक्रम राबवले. मोठ्या पुस्तकांचे अर्थपूर्ण छोटे विभाग करून वक्तृत्व स्पर्धा घेतल्या. तीन गट केले- कधीही स्पर्धेत भाग न घेतलेला, नेहमी स्पर्धेत भाग घेऊनही बक्षीस न मिळवलेला आणि पट्टीच्या बोलणाऱ्यांचा. दर रविवारी स्पर्धा होत. मुलांना वाचनाची इतकी गोडी लागली की अनेक मुलं 'जेवण नको-पुस्तकं हवी' म्हणायला लागली. त्यांच्या ज्ञानाचं क्षितिज खूप विस्तारलं. पहिल्या गटातली मुलं प्रगती करत तिसऱ्या गटात दाखल झालेली पाहिली की साऱ्या श्रमाचं चीज झाल्याचं समाधान वाटायचं.

रोटरी क्लब ऑफ पुणे वेस्ट-एंडनं तीन ब्रेल प्रिंटर दिले. यामध्ये सॉफ्ट कॉपीजवरून ब्रेल पुस्तकं प्रिंट करता येतात. प्रकाशकांकडून सॉफ्ट कॉपीज मिळवण्याची खटपट केली. ब्रेल हाती लिहिण्यापेक्षा हा प्रवास बरा म्हटलं, तरी इथंही लढा होताच. कित्येकवेळा प्रकाशकांना 'निवांत'मधला एखादा कॉम्प्युटर प्रिंट करण्यापुरता द्यावा लागला. या प्रिंटरमुळे 'व्हिजन अनलिमिटेड' या आमच्या लायब्रीत अनेक भाषांमधले ३००० हून अधिक ग्रंथ जमा झाले. खेड्यापाड्यातल्या लेकरांसाठी लायब्ररीच्या सतरा शाखा महाराष्ट्रभर उभ्या राहिल्या.

पुस्तकात कोष्टकं किंवा रकाने असतील तर ब्रेल रूपांतर करणाऱ्या सॉफ्टवेअरला ते कळत नाही. ते पुन्हा म्हणजे जवळ-जवळ सगळंच परत टाइप करावं लागतं. समीकरणं, गणितं, अर्थशास्त्रातले आलेख यांचं फक्त वर्णनच द्यावं लागतं. कधी फाँटचा प्रॉब्लेम आला तर एक-एक अक्षर वाचत चुका सुधाराव्या लागतात. 'निवांत'चे अनेक स्वयंसेवक हे काम अत्यंत निष्ठेनं करतात. पूर्वी हे सारं मी स्वत:च करत बसायची, आता मोठ्ठी टीम मिळाली आहे.

'निवांत' मधले अभ्यासाचे लढे जगावेगळे होते. पुस्तकं नाहीत,





कॅसेटस् नाहीत, विषय मुळातच समजलेले नाहीत, साध्या साध्या मराठी शब्दांचे अर्थही ठाऊक नाहीत. अशा अनेकांना शिक्षणधारेत ठेवायच्या कामाची धुरा पहिली चौदा वर्षं मी एकटीनं सांभाळली. प्रयोग करत करत या मुलांपर्यंत पोहोचण्याच्या विविध कला समजल्या. ब्रेल शिकताना दोन बोटांच्या सहा पेरांचा ब्रेल टिंबासारखा वापर करत मी ब्रेल अक्षरं शिकले. रस्त्यात स्वत: डोळे मिटून चालून पाहून, न दिसण्याची अडचण समजून घेतली. घरातल्या ओट्यावर, बेसिनवर ब्रेलचे तक्ते लटकवून ब्रेल शिकले.

**सर्वांगांनी बहर**

‘निवांत’ म्हणजे एक मोठी प्रयोगशाळाच आहे. इथे अभ्यासाबरोबरच शामक डावरांचं चकित करेल असं पाश्चात्य नृत्य, चित्रकला, गाणं, वृक्षारोपण, पक्ष्यांशी गप्पा मारणं, योगा, ज्यूडो, राज्यस्तरीय क्रिकेट स्पर्धा भरवणं, रक्तदान, मल्लखांब, स्केटिंग सारं मुलांच्या कलानं घडलं. इथली १,५००हून अधिक लेकरं ५,००० ते ३५,००० रुपये कमवायला लागली आहेत. सॉफ्टवेअर क्षेत्रात स्वत:ची टेक्-व्हिजन नावाची सॉफ्टवेअर फर्म निर्माण झाली आहे. त्यांना अमेरिकेतून डॉलर्समध्ये प्रोजेक्टचं पेमेंट सुरू झालं आहे. भारतीय ग्राहकही मिळाले आहेत. मुलं म्हणतात – ‘टेक्नॉलॉजी इज नो बार फॉर अस.’ बोर्ड-वॉक टेक, इन-साइट ॲकॅडमी सर्वांकडे अगदी आपल्यापेक्षाही जास्त टेक्नॉलॉजी कळणारी मुलं निर्माण झाली आहेत. चौथ्या जनरेशनची आर. ओ. आर. ही लँग्वेज शिकायला त्यांच्याकडे डोळस इन्टर्न्स आले आहेत.

मुलं सर्वांगांनी बहरली. विविध विषय-कला, वाणिज्य, लॉ, कॉम्प्युटर सायन्स, लायब्ररी सायन्स, डान्सिंगमध्ये ग्रॅज्युएशन (कथ्थक-शमा भाटेंकडून), परकीय भाषा-जर्मन, जॅपनीज, बेकरी कन्फेक्शनरी, एम्. एस्. डब्ल्यू इत्यादी अनेक क्षेत्र ‘निवांत’च्या मुलांनी पादाक्रांत केली. गेल्या सतरा वर्षांचा निकाल १०० टक्के आहे आणि कित्येकांनी आपापल्या क्षेत्रात विद्यापीठात प्रथम येऊन दाखवलं आहे. विशेष दृष्टीच्या व्यक्तींनी कधीही न व्यापलेली क्षेत्रं व्यापताना इंग्रजी माध्यमही लीलया स्वीकारलेलं आहे आणि पी. एच्. डी. पर्यंत शिक्षण चालू आहे.

अभ्यास करतानाही मुलं पैसे कमावताहेत. उत्कृष्ट व आंतरराष्ट्रीय दर्जाची चॉकलेटं, ब्रेल कार्डस्, पेपर बॅग्ज, ऑरगंडीची देखणी गुलाबाची फुलं बनवून त्याची विक्री करून स्वत:ची फी, मेसबिल्स तर ही लेकरं भरतातच, पण स्किझोफ्रेनिया अवेअरनेस असोसिएशन, ऑटीझम सेंटर यांना आपल्या प्राप्तीतील एक टक्का द्यायला विसरतही नाहीत. ‘निवांत’च्या कमावत्या विद्यार्थ्यांचा ‘सो कॅन आय’ क्लब एखाद्या अंध बांधवाची वीस ते पंचवीस हजार फी भरून त्याच्या शिक्षणात खंड पडू देत नाही. अनुत्पादक म्हणून सोडून दिलेली ही लेकरं इतकी उत्पादक झाली आहेत की ती आपल्यालाही सांभाळतात. सर्व कामं स्वत: करतात. ‘निवांत’ कुठलंच काम ‘आऊट सोर्स’ करत नाही. अंधत्वाचं इथं भांडवल नसून ‘निवांत’ हे तर समर्थ माणसांचं गाव आहे. अनेकांची लग्नं झालीयत....त्यांच्या काळ्याभोर, लुकलुकत्या डोळ्यांच्या लेकरांची मी आता मीराआज्जीही झालीये.

**अनोखं पालकपण**

कुठून कुठं झाला हा प्रवास ! कुठं एकटी उमा आणि कुठं ही शेकडो लेकरं? जीवनाचा हिशोबच वेगळा झाला. जगावेगळं ‘पालकपण’ स्वीकारताना आयुष्यानं फारच वेगळं वळण घेतलं. एकमेकांत मिसळत जाणारं पालकत्व नात्यांनाही एकमेकात पार विरघळवून गेलं. अगदी सहजसुंदर प्रक्रिया घडली. उमा मोठी होता-होता या गोकुळाबरोबरच वाढत गेली. या गलक्यातच तिचं बी. ई. (मेकॅनिकल इंजिनिअरिंग) झालं. सामाजिक जाणिवेचे धडे तिला जीवनातूनच उमगले. आपली आई शेकडो मुलांबरोबर वाटून घेणं सोपं असतं का? तिनं मात्र ते सहजपणे स्वीकारलं. कधी ती उमाताई झाली तर कधी ‘उम्मी’ नामक मैत्रीण झाली. त्यांना कॉम्प्युटर शिकवताना मी कधीही तिला चिडताना पाहिलं नाही. पोरं खळाळून हसत तिच्यासोबत संगणकावर प्रेम करायला शिकली. मी वैतागले तरी उमा त्यांच्यावर फारशी चिडली नाही. उलट मलाच शांत करत राहिली. तिची बेडरूमही आम्ही अभ्यास घ्यायला, चॉकलेटस् करायला वापरायला लागलो.

**उत्तम दर्जाचा आग्रह**

नेहमीच एका गोष्टीवर कटाक्ष ठेवला की चॉकलेट असतो वा ब्रेल कार्ड असो. आपल्याला दर्जात्मक उत्पादन द्यायचं आहे. अंध म्हणून एखाद्या वेळी समोरची व्यक्ती दयेनं एखादी सुमार गोष्ट विकत घेईल. परंतु दर्जा उत्तम असेल तरच ती उत्पादनं पुन्हापुन्हा विकत घेतली जातील. कित्येकदा लोक म्हणतात, ‘‘आम्ही आजपर्यंतच्या आयुष्यात इतकी सुंदर चॉकलेटस् कधी खाल्ली नाहीत. तेव्हा सारा प्रवास आठवून अभिमान वाटतो.’’

मला सारे विचारतात, ''रक्ताचं नातं जास्त गाढं असतं ना? स्वत: जन्म दिलेली मुलं आणि या मुलांत काय फरक असतो?'' खरं सांगू? मला काहीही फरक वाटत नाही. जन्म देणं केवळ निमित्तमात्र असतं. 'अंधाराचं मानसशास्त्र' समजता-समजता या लेकरांवर मायेची पाखर घालताना माझ्या प्रेमाचं झुकतं माप त्यांच्याच दिशेनं होतं. पंखात बळ असणारी उमा आणि पंखात बळ निर्माण करण्यासाठी माझी वाट पाहणारी पिलं यात बळ हवं असणारं मूलच मला अधिक स्वत:चं वाटत राहिलं.

भावनिक वादळंही आली. कशी टाळता येतील ती? दिल्लीला कॉमनवेल्थ गेम्ससाठी जबाबदारीचं काम करताना पार थकलेल्या उमाचं रडणं अजून ऐकू येतं - ''ममा, तू इथेच रहा. जाऊ नको.' अनेक दिवस आसवांचे कढ येत राहायचे. समोर उभ्या पल्लवीची ब्रेन ट्यूमरची शस्त्रक्रिया, वृषा, सुनीता, समीना, संध्या कुणाचीतरी अडलेली ॲडमिशन, अभ्यासविषय समजून घ्यायला निष्ठेनं उभी असलेली बंद डोळ्यांच्या चिमण्यांची रांग; भयावह, कल्पनातीत, काहिलीत भाजलेल्या आयुष्यामुळे झालेले मानसिक गुंते सोडवताना भिजलेले खांदे... साऱ्यांनी मला या शेकडो लेकरांना अनाथापासून सनाथापर्यंत आणण्यासाठी जगायला शिकवलं.

उमा आणि 'निवांत'ची लेकरं यांच्यातून 'चांगली माणसं' घडवणं शक्य झालं. त्याचं कारणच 'निवांत' कुटुंबात उमा वाढली आणि उमाबरोबर 'निवांत' बहरलं हे आहे. तत्त्वज्ञान शिकवून, भाषणं देऊन-ऐकवून, प्रेरणादायी कथा वाचूनही जे घडलं नसतं ते केवळ एकत्र जगताना, जगण्याची जाण वाढल्यानं घडलं. सहज घडलं. 'सारं माझं- घर, गाड्या आणि मुख्य म्हणजे आई-बाबा' या स्वार्थी, पझेसिव्ह विचारातून बाहेर पडून उमा सारं काही वाटून घ्यायला शिकली. अगदी नकळत. 'आहे रे' असणारी मुलं 'नाही रे' चा संघर्ष जवळून पाहतात तेव्हा ती अंतर्मुख होऊन विचार करतात, स्वत:च स्वत:मध्ये बदल करतात.

हे सर्व काम माझं एकटीचं नाहीच. माझ्याइतकंच ते आनंद, उमा यांचंही झालंय. इतकंच नाही तर सासर-माहेरकडचे माझे सर्व आप्त त्याला सुरुवातीपासूनच विविध प्रकारे हातभार लावताहेत. आमचं 'निवांत'मय असणं त्यांनी खूप छान स्वीकारलंय.

अनेकदा वाटतं, या साऱ्या आयुष्यात आलेल्यांमधून चांगली माणसं घडवता आली. त्यांना दर्जात्मक जीवन देता आलं. सारा जगावेगळा प्रवास घडला. मजा आली. १,५०० पेक्षा जास्त माणसांना 'आयुष्य सुंदर आहे' तुम्हीही आयुष्याच्या सौंदर्याला हातभार लावू शकता हे सांगता आलं. तेही घडवतील अजून आपल्यासारखेच शिलेदार - माणसाला माणूस म्हणून जगायचा अधिकार मिळवून देणारे !

जन्म आणि मृत्यू या दोन टिंबांमध्ये प्रवास करताना पालकत्वही येतं...पण कामातून उमललेल्या माझ्यातल्या पालकाला समाधान वाटतं की नैसर्गिक आणि लाभलेलं 'पालकपण' यांच्या संगमानं माझं भौतिक, सीमित अस्तित्व अमर्यादित केलं.

■ ■ ■


**निवांत अंध मुक्त विकासालय,**
सर्व्हे नं. ३३/१, प्लॉट नं. ७५,
विद्यानगर, पुणे - ४११०३२.
ईमेल : niwantvision@gmail.com


## निवांतचं विस्तारित कुटुंब

पहिल्या पगारातून सगळ्या चिमण्या पाखरांनी ब्रेल पुस्तकांसाठी पैसे देवघरात ठेवले - सगळ्या मित्रमैत्रिणींना पार्ट्या दिल्या- नोकरी मिळाल्यावर 'निवांत'च्या लेकरांनी सांगितलं, ''मॅडम, आम्ही तुमचे कमावते लेक आणि लेकी आहोत. पैसे, कष्ट, काहीही देऊ - काळजी करू नका. आम्ही आहोत.'' सिनियर मुलं नवीन येणाऱ्या 'निवांत'च्या मुलांकडून मनापासून अभ्यासाचे, स्वच्छतेचे धडे गिरवून घ्यायला लागली. माझी ही लेकरं माझंही पालकत्व स्वीकारायला लागली. माझ्या आजारपणात उशा-पायथ्याशी बसून प्रेमानं सेवा द्यायला लागली. पल्लवीच्या ब्रेन ट्यूमरच्या सर्जरीसाठी साऱ्यांनी लाखो रुपये उभे केले. तिची नोकरी जाऊ नये म्हणून तिच्याबदली काम केलं. दवाखान्यात तिची सेवा केली. कोण म्हणेल तिला एकटं? 'निवांत' संस्था न होता एक मोठं कुटुंब बनलं. कायद्याच्या चौकटीत घुसमटत काम करणाऱ्या संस्थांपेक्षा 'निवांत'मध्ये हृदयाची चौकट फार विस्तृत करता आली.

मागं वळून पाहताना नवल वाटतं की मराठी, इंग्रजी, इतिहास, अर्थ, राज्य, समाज, मानस सगळी शास्त्रं, एम्. एस्. आय. टी.चे वर्ग, कसं केलं असेल आपण सारं? ब्रेल पुस्तक लिखाण, प्रकाशनं, प्रूफरिडींग, ब्रेल प्रिंटिंग, एडिटिंग, हिशोब लिहिणं.

सर्व वर्गांचे, अनेक वर्षांचे, सर्व माध्यमाचे पेपर सोडवणं, त्याचं रेकॉर्डींग, एडिटिंग, मुलांच्या ॲडमिशन्स, नोकऱ्यांसाठी संपर्क, पाठपुरावा, संस्था दाखवणं, जागृतीपर भाषण देणं. ऑर्केस्ट्रा, डान्स, ज्यूडोची प्रॅक्टिस अन् मुलं कार्यक्रमाला वेळेवर पोहोचतील की नाही याची चिंता. शिवाय दिवसाचे तास वाढविण्यासाठी मुलांना परीक्षेआधी 'निवांत'वर राहायला बोलावून, गुरुकुल पद्धतीनं त्यांचा अभ्यास घेणं. शैक्षणिक साधनं निर्माण करण्याचं आव्हानही फार मोठं आहे. विविध विषय शिकवताना नवनव्या कल्पना लढवायला लागल्या. उदा. स्वत:च्या शरीराचा वापर करून डाव्या व उजव्या हातांचा वापर करून 'य' व 'क्ष' अक्ष शिकवणं, कोष्टकं- रकाने ह्या संकल्पना सांगण्यासाठी आयताकृती रद्दी कागदाच्या उभ्या घड्या (रकाने) आडव्या घड्या (ओळी) वापरणं, टॅली शिकवताना काडेपेटीच्या काड्यांचा वापर करणं, चित्रकला, नृत्य, वृक्षारोपण, रक्तदान सारे जीवनानुभव देऊन जमेल तितकं त्यांचं आयुष्य समृद्ध करणं, इंग्रजी माध्यमाच्या मुलांसाठी विषयानुरूप डिक्शनऱ्या तयार करणं, निराशेच्या गर्तेत अडकलेल्यांना धीर देणं, प्रकाशकिरणं दाखवणं सारं निवांतच्या प्रयोगशाळेत घडत गेलं.

आता एम. पी. थ्री.चा वापर, मोबाईल, टॅबलेट पीसी, ब्रेल प्रिंटर, जॉज्चा वापर यामुळं या नव्या तंत्रज्ञानांमुळं विशेष दृष्टीच्या विद्यार्थ्यांच्या आयुष्यात क्रांती आली आहे.

नुकतंच ‘मर्यादांच्या अंगणात वाढताना’ या सुजाता आणि अरुण लोहकरे यांनी लिहिलेल्या पुस्तकाचं प्रकाशन पुण्यात झालं. विशेष म्हणजे ब्रेलमधल्या या पुस्तकाचं प्रकाशनही याच समारंभात झालं. ‘निवांत’नंच ते ब्रेलमध्ये करून दिलेलं आहे. सईला- आपल्या मतिमंद मुलीला चांगल्या प्रकारे वाढवण्याचं आव्हान त्यांनी डोळसपणानं स्वीकारलं. धडपडत, पण निश्चयपूर्वक; माणसाच्या चांगुलपणावर विश्वास ठेवत, विवेकाची कास धरत, सईच्या आणि स्वतःच्याही आयुष्यात आनंद पेरत त्यांनी ते समर्थपणे पेललं. त्याची अंतर्मुख करणारी कहाणी म्हणजे हे पुस्तक आहे. सुजाता गेली अनेक वर्षं पालकनीतीची मैत्रीण आहे. अनेकदा तिचं लेखन आपण वाचलेलं आहे. संपादनातही तिनं अनेकदा मोलाचं सहकार्य केलेलं आहे.




सुजाता-अरुणच्या पुस्तकाचा हा एरवी असतो तसा पुस्तक-परिचय नाही. हे पुस्तक वाचताना पालकनीती गटातल्या मैत्रिणी-मित्रांना जाणवलेल्या काही विशेष मुद्यांविषयी त्यांनी जे मांडलं ते एकत्र करून इथं देत आहोत. ‘साधना व्हिलेज’ या अशाच मर्यादांच्या अंगणात वाढणाऱ्या, शरीरवयानं प्रौढ पण तरीही मनाबुद्धीनं बालक असणाऱ्यांसाठी असलेल्या संस्थेच्या वसंत देशपांडेसरांनी उत्स्फूर्तपणे लिहिलेल्या प्रतिक्रियेचाही यात अंतर्भाव आहे. सहपथिक, सहसंवेदक या नात्यानं त्यांनी दिलेल्या या प्रतिक्रियेला विशेष मोल आहे.

प्रिय सुजा आणि अरुण (सई आणि सलोनीसह)

पुस्तक वाचून काढायला बसले, आणि संपवूनच उठले. साधं सरळ, तरीही किती धीटपणे लिहिलं आहे अग तुम्ही दोघांनी! मुख्य म्हणजे कुठंही चिडचिड नाही, दोषारोप नाहीत. आपल्या बाळांना चांगल्या जीवनाची जाणीव साथसोबतीला द्यायची तर ती आपल्या वागण्यातूनच द्यायला लागते, पण असं शब्दांनी न म्हणता तुम्ही ते फार सुरेलपणानं करून दाखवलंत, आणि त्याचा अनुभवही वाचणाऱ्याला निखळपणानं पोचवलेला आहेत. ब्राव्हो!

सई फार भाग्यवान मुलगी आहे. असं कदाचित अनेकांना पटणार नाही, पण मला मात्र वाटतं. तिच्या वाट्याला फार चांगले पालक आले हे तिचं भाग्यच आहे, आणि ती इतकी शहाणी मुलगी आहे, की तिनं आपल्या पालकांना अधिकाधिक चांगलं पालक केलं आहे. सलोनीचंही विशेष कौतुक करायला हवं. सईकडे तुम्ही दुर्लक्ष केलं नाहीत, ही तर कौतुकाची बाब आहेच, पण सलोनीकडेही केलं नाहीत, हेही एक विशेष आहे.

आणखी एक, काही गोष्टी आपल्याला नकोत म्हणून जरी तुम्ही सोडल्या असल्यात, तरी गेल्या वीस वर्षात किती गोष्टी करत आलात तुम्ही; शिक्षण, परीक्षा देणं, व्याख्यानं, सेमिनार, लेखन, अगदी कवितेसारख्या पाय घसरवायला साजेशा क्षेत्रातही. मुख्य म्हणजे मनाला कधी शिळंबासं होऊ दिलं नाहीत. खूप अभिमान वाटतोय तुमचा.

**- संजीवनी कुलकर्णी**

सुजाता व अरुण यांनी त्यांची ‘विशेष’ मुलगी सई हिला वाढवताना परिस्थितीशी ज्या असाधारण धैर्यानं लढा दिला, त्याची ही संवेदनशील कहाणी आहे. भावनेच्या भरात वाहून न जाता केलेलं , तरीही मन हेलावून टाकणारं आणि मुख्यतः कोणताही आडपडदा न ठेवता केलेलं हे कथन आहे. सईचं स्वास्थ्य, सुयोग्य संगोपन आणि विकास हे दोघांच्याही आयुष्याचं महत्त्वाचं उद्दिष्ट आहे. सुजाता शिक्षण-अधिकारी तर अरुण पत्रकार आहेत. दोघांची कामं चाकोरीबद्ध नव्हेत. तिथली आव्हानं पेलत असतानाही त्यांनी जीवनाचं हे उद्दिष्ट जराही नजरेआड होऊ दिलं नाही. लोकांच्या सहानुभूतीशून्य, असमंजस वागणुकीला किंवा नशिबाला दोष न देता, त्यांनी आयुष्याचा ते जसं आहे तसा केलेला स्वीकार कौतुकाच्याही सीमापार आहे. स्वतःच्या भविष्याबद्दल निर्णय घेण्याच्या सईच्या हक्कांचा त्यांनी अतिशय खुल्या दिलानं केलेला स्वीकार ही तर या सगळ्यातली विशेष दाद देण्याजोगी बाब आहे. सईला वाढवताना त्यांनी जे काही केलं तो त्यांचा प्रवास अशाच परिस्थितीतील सर्व पालकांसाठी अनुकरणीय आहे. हे पुस्तक वाचणाऱ्यांना ‘लेखकांसोबत वाढवत नेतं,’ एवढंच मी म्हणेन.

**-वसंत देशपांडे**

ही कहाणी आहे दोघा धडपडणाऱ्या आईबाबांच्या अनुभवांची, ज्यांनी आपल्या अंगणात उभारलंय आनंदाचं झाड. तेही अत्यंत परिश्रमानं, सचोटीनं. आपलं मूल वेगळं म्हणून त्याचा बाऊ न करता, तिला अनेक अर्थांनी स्वावलंबी बनवलंय.

आपल्या आजूबाजूच्या ‘विशेष’ मुलांना त्यांच्या वाट्याचा आनंद अनुभवता यावा असं आपल्याला वाटत असेल तर, त्यांच्याकडे ‘बिचारी’ म्हणून बघण्याची आपली सवय बदलायला हवी. ज्यांची मुलं ‘विशेष’ आहेत त्यांनी आणि ज्यांना ही मुलं ‘आपली’ वाटतात त्या सर्वांनी मिळून एकदा हे पुस्तक जरूर वाचायला हवं.

**- आम्रपाली बिराजदार**

हे पुस्तक वाचत असताना कितीतरी वेळा वाटलं, 'अरे हे या वेगळ्या मुलीसाठीचं पालकत्व नव्हे तर सर्वसामान्य पालकांसाठीचाही वस्तुपाठ आहे'. विशेषत: 'आहे रे' गटातला पालकवर्ग पालक-मूल नात्यातले कितीतरी मूल्याधार गमावून बसलेला आहे. स्पर्धा, परीक्षा, मार्क्स आणि क्लासेस यांच्या गदारोळात साधं सुंदर जगण्याचं मूलभूत तत्त्वच हरपून चालणार नाही, याची जाणीव करून देण्याचं काम हे पुस्तक करतं. आशावादाची आणि प्रयत्नवादाची लख्ख झळाळी सुजाता-अरुण आणि सई-सलोनीच्या या प्रवासाला आहे.

'मर्यादांचा स्वीकार म्हणजे निष्क्रियता किंवा आहे त्यात समाधान मानून तिथं थांबणं नव्हे; तर समजेच्या मर्यादांवर प्रयत्नांच्या शक्तीनं मात करत राहणं आहे.'

अतिशय निरलस, प्रामाणिक मांडणी हे या पुस्तकाचं बलस्थान आहे आणि म्हणूनच ते थेट मनाला जाऊन भिडतं. भावनेची तरल किनार असली तरी विवेक-विचाराच्या भक्कम पायामुळे ते अधिक मौलिक बनतं. हे अनुभव केवळ सई, तिचे आई-बाबा यांचे राहत नाहीत तर ते वाचणाऱ्यांचे होतात. पालक म्हणून ते आपल्याला विचार करायला भाग पाडतात.

**- वंदना कुलकर्णी**

आपल्या विशेष बाळाचा ते जसं असेल तसा संपूर्ण स्वीकार आणि त्याच्या विकासासाठी या जगातल्या शक्य आहेत त्या सगळ्या गोष्टी करण्याची तयारी हा या पुस्तकातला मला भावलेला पहिला भाग. याहीपुढं जाऊन हे संगोपन स्वार्थत्यागाच्या भावनेखाली दडपू नये म्हणून जाणीवपूर्वक, आनंदानं, आणि वेळच्यावेळी केलेला स्वीकार मला फार महत्त्वाचा वाटतो. बाळाचं आयुष्य आनंदात जावं असं जर पालकांना वाटत असेल तर त्यांनी स्वत: दु:ख-वेदनेत, दडपणाखाली राहून चालणार नाही. त्यांनीही जीवनाचा स्वीकार आनंदानं करायला हवा, हे केवळ विशेष पालकांसाठी नाही तर अगदी सामान्य पालकांसाठीही महत्त्वाचं आहे.

**- शुभदा जोशी**

पुस्तक-प्रकाशन समारंभाच्या पूर्ण कार्यक्रमात सईला सहभागी करून घेतलेलं होतं. तिचा उल्लेख करताना उघडपणानं मतिमंद असा शब्द वापरला जात होता. क्षणभर मला आश्चर्य वाटलं, पण हेही जाणवलं की त्यात एक नितांत सरळ सहजता आहे. कुठेही लपवाछपवी, वेगळे शब्द वापरण्याचा अट्टहास नाहीय. विशेष सक्षम- यासारखे मुद्दाम बनवलेले शब्द वापरण्यातून येणारा 'मतिमंद म्हणजे काही वाईट, नकोसे आहे' असा भाव या लोकांच्या मनात कुठेही नाही. सर्वांच्याच वावरण्यात परिस्थितीचा एक अकृत्रिम, समंजस, नि:संदिग्ध आणि सप्रेम स्वीकार होता, मला तो फार आवडला.

**- नीलिमा सहस्रबुद्धे**

या पुस्तकातला विशेष भाग म्हणजे सई आणि तिच्यासारख्या मतिमंद मुलांच्या संदर्भातला त्यांच्या लैंगिक गरजांचा विचार. एरवी असे पालक इतके अगतिक होतात की अशा मुलींची गर्भाशयं काढण्याइतका भयंकर विचार त्यांना सुचू शकतो, हे आपल्याला माहीतच आहे. इथे हे पालक इतके प्रेमळ आणि संवेदनशील आहेत की आपल्या ह्या मुलीलाही सहजीवनाचा सहजसुंदर अनुभव मिळावा, तिला हक्काच्या सोबतीसाठी, आधारासाठी, स्पर्शासाठी बरोबरीचं माणूस मिळावं, असा विचार ते करतात इतकंच नाही, तर तो प्रत्यक्षात आणण्याची योजनाही आखतात. त्यांचा हा विचार केवळ धाडसाचा आणि स्वप्नाळू नाही तर काळजीपूर्वक, विचार-विवेकानं नियोजन करण्याचा आहे, सामाजिक पालकत्वाचा आहे आणि म्हणूनच मोलाचा आहे !

**- प्रियंवदा बारभाई**

आपलं वेगळं असलेलं मूल समजून स्वीकारण्यात आणि त्याच्याबरोबर शिकत आणि वाढत राहण्यात एक वेगळाच आनंद आहे. याचा प्रत्यय हे कुटुंब गेली वीस वर्षं घेत आहे. आपल्या वेगळ्या मुलांना वाढवत असलेल्या अधिकाधिक पालकांपर्यंत या समजुतीचे काही धागे पोहोचवावेत आणि त्यांच्याशी संवाद साधावा ही आपली जबाबदारी आहे असं त्यांना वाटतं. म्हणूनच या पुस्तकातल्या निवडक अनुभवांच्या अभिवाचनाचा एक तासाचा कार्यक्रम ते विशेष मुलांच्या पालकांसाठी करू इच्छितात. विशेष मुलांच्या शाळा, पालक संघटना, स्वयंसेवी संस्था किंवा पालकांच्या गटांनी या कार्यक्रमासाठी जरूर संपर्क साधावा.

फोन नं. ९९२२४४२०६५

ईमेल - sujata.saloni@gmail.com

# स्वायत्ततेच्या दिशेनं

शुभदा जोशी

**ऑगस्ट २०१३च्या पालकनीतीच्या अंकात आपण मोहन हिराबाई हिरालाल यांचा लेख वाचलात. या लेखात मोहनभाऊंनी स्वत:च्या वैयक्तिक पालकत्वासंदर्भात आणि सामाजिक कामातल्या आजपर्यंतच्या प्रवासाबाबत सविस्तर मांडणी केलेली आहे. मेंढा (लेखा) हे गडचिरोलीपासून तीस किलोमीटर अंतरावर वसलेलं एक छोटंसं आदिवासी गाव आहे. या गावानं फार मोठी कामं करून दाखवलेली आहेत. २००६ सालच्या वनहक्क कायद्यानुसार गावाच्या १८०० हेक्टर जंगलाच्या व्यवस्थापनाचा आणि उत्पन्नावरचा हक्क मोठ्या हिंमतीनं मिळवलेला आहे. सरकारकडून असा हक्क मिळवणारं आणि या हक्कांचा वापर करून गावाचा सर्वांगीण विकास घडवणारं मेंढा (लेखा) हे भारतातलं पहिलं गाव आहे.**

**मेंढ्यातली सर्वसहमतीनं निर्णय घेण्याची, जबाबदारीनं या निर्णयांची अंमलबजावणी करण्याची आणि सर्वांच्या हिताची पाठराखण करत विकास साधण्याची पद्धत अचंबित करणारी आहे. ही संपूर्ण प्रक्रियाच फार वेधक आहे. मेंढ्याची गेल्या सव्वीस वर्षांची ही प्रदीर्घ वाटचाल समजून घेण्याचा मी प्रयत्न केला. मोहनभाऊंनी लिहिलेल्या पुस्तिका आणि मिलिंद बोकील यांचं 'गोष्ट मेंढा गावाची' हे पुस्तक वाचलं, त्यातून हा आगळा-वेगळा प्रयोग अधिक खोलवर समजून घेण्याची उत्सुकता निर्माण झाली. मेंढ्याच्या प्रत्यक्ष भेटीतून, मोहनभाऊ आणि देवाजी तोफा यांच्याशी झालेल्या गप्पांमधून अनेक गोष्टी उलगडत गेल्या. अनेकदा तर आपण वास्तव जगात नाही, जणू स्वप्नातल्या गावाबद्दल वाचतो, ऐकतो आहोत असं वाटावं असा हा अनुभव होता. पण ते तसं नाही. जित्याजागत्या माणसांचं आणि आपल्याच देशातलं हे अगदी खरंखुरं गाव आहे.**

**मेंढा गावाचं चित्र**

स्वच्छ, सुंदर आणि हिरवंगार, जंगलाला लागून वसलेलं पाचशे लोकवस्तीचं हे गाव! एकेका कुटुंबाची कौलारू घरं, परसबागेत आंबा, मोह, जांभळाची झाडं, घरापुरती भाजी; प्रत्येक घराला बांबूचं कुंपण, चुलीच्या धुरापासून बायकांची मुक्तता करणारा गोबर गॅस प्लँट, स्वच्छ शौचालयं, वाळवणासाठी मांडव, गुरांसाठी स्वतंत्र-स्वच्छ गोठे, घरातल्या मुलग्याचं लग्न झालंय हे सांगणारा कोरीव काम केलेला खांब समोरच्या अंगणात रोवलेला- अशी सुखसोयींची आणि सौंदर्याची अनुभूती देणारी सुंदर घरं. गावात रस्ते, विहिरी, वीज अशा सर्व मूलभूत सोयीसुविधा आहेत. गावातील प्रत्येक कुटुंबाची सुमारे दोन एकरांची शेती आहे. गावाच्या जंगलातून बांबू, तेंदूपानं, मोह, चारोळी, जांभळं, डिंक, मध अशी उत्पादनं मिळतात. बांबूचं उत्पन्न विशेष महत्त्वाचं! बांबू कटाईतून गावातल्या लोकांना उत्तम मजुरी मिळते. त्याबरोबरच बांबूच्या विक्रीतून गावाला भरघोस पैसा मिळतो. गावफंडात जमा झालेल्या पैशांचा गावाच्या विकासासाठी कसा उपयोग करायचा याचे निर्णय ग्रामसभेत सर्वसहमतीनं घेतले जातात. निर्णयप्रक्रियेत पुरुषांच्या बरोबरीनं स्त्रियांचा सहभाग असतो. 'आमच्या गावात आम्हीच सरकार, दिल्ली-मुंबईत आमचं सरकार' ही या गावाची घोषणा आहे. या घोषणेनुसार आर्थिक व्यवहारांची अत्यंत उत्तम घडी बसवलेली आहे. उदाहरणार्थ, या गावाची आर्थिक व्यवहाराची रचना बघा. पैसे काढण्याचं काम दोन व्यक्तींकडे दिलेलं आहे. पासबुक तिसऱ्या व्यक्तीकडे ठेवलेलं असतं. खर्च करण्याची जबाबदारी चौथ्या व्यक्तीकडे असते, तर हिशोब पाचवी व्यक्ती ठेवते. याखेरीज झालेले सर्व व्यवहार ग्रामसभेमध्ये मांडावे लागतातच. अशा रचनेमुळे अनेकांना आर्थिक व्यवहारात सहभाग तर मिळतोच शिवाय व्यवहार सदैव पारदर्शी राहतात.

गावाच्या या सुंदर, आदर्श रूपामागे गावाचे गेल्या सव्वीस वर्षांचे अपार कष्ट आहेत.

## कसं घडलं हे सारं?

हे घडू शकण्यामागचं कारण म्हणजे मेंढा हे मुळातच आदिवासींच्या समृद्ध आणि शहाण्या परंपरांनुसार चालणारं गाव आहे. निसर्गाची निगराणी करणं, सर्वांनी मिळून सामंजस्यानं निर्णय घेणं आणि त्यांची अंमलबजावणीही सर्वांनी मिळून करणं हे मेंढ्यामध्ये वर्षानुवर्षं चालत आलं आहे.

मात्र असं असलं तरी, मेंढ्यामध्येही गरिबी, वंचितता, निरक्षरता, व्यसनाधीनता, अंधश्रद्धा असे सर्व प्रश्न होतेच. या सगळ्या परिस्थितीतून मेंढा मार्ग काढू शकलं याचं एक महत्त्वाचं कारण मेंढ्याला मोहनभाऊंसारखा सहयोगी मित्र लाभला. देवाजी तोफांसारख्या सक्षम आणि लोकहिताची तळमळ असलेल्या नेत्याला मोहनभाऊंची विचारी साथ






मिळाली आणि त्यामुळंच मेंढ्याच्या विकासाला गती मिळाली.

तरुण वयापासून मोहनभाऊ सभोवतालच्या समाजात आढळणाऱ्या गरिबी, बेरोजगारी, हिंसा यासारख्या प्रश्नांमागच्या कारणांचा आणि त्यांच्या उत्तरांचा वेध घेत होते. जयप्रकाश नारायण, नारायणभाई देसाई, दत्ता सावळे, वसंत पळशीकर यांच्या समवेत चर्चा करत विविध सामाजिक कामांमध्ये, चळवळींमध्ये सहभाग घेत होते. गांधी, विनोबा, फुले, आंबेडकर, मार्क्स, पावलो फ्रेअरे यांच्या विचारांचा अभ्यास करत होते. गांधीजींच्या 'हिंद स्वराज्य' या पुस्तकाची तर त्यांच्या संपूर्ण जडणघडणीत आणि कार्यप्रवासात फार महत्त्वाची भूमिका राहिलेली आहे; प्रश्न समजून घ्यायला आणि त्यांचं आकलन व्हायलाही! भारतातील लोकशाही व्यवस्था ब्रिटिश संसदेच्या रचनेवर आधारित आहे. गांधीजींनी 'हिंद स्वराज्य'मध्ये ब्रिटिश संसदेवर कडाडून टीका केलेली आहे. गांधीजी लिहितात, 'जिला तुम्ही लोकशाहीची जननी आणि जगातील आदर्श राज्यव्यवस्था म्हणत आहात त्या इंग्लंडच्या संसदेला मी नुकताच जवळून पाहून येत आहे. इंग्लंडची संसद वांझोटी आहे आणि वेश्या आहे. हे दोन्ही शब्द कडक असले तरी बरोबर लागू पडणारे आहेत. मी तिला वांझोटी म्हटले, कारण आजपर्यंत संसदेने आपण होऊन एकसुद्धा चांगले काम केलेले नाही. तिच्यावर बाहेरून दडपण आणणारे कोणी नसेल तर ती काहीच करणार नाही. वेश्या अशासाठी म्हटले की ती धनदांडग्यांच्या हातात राहते.'

'काय चुकतं आहे' हे यातून नेमकेपणानं लक्षात आलं तरी 'व्यवस्था कशी असायला हवी', याबाबत मात्र 'हिंद स्वराज्य'मध्ये स्पष्ट मांडणी केलेली नाही. आचार्य विनोबा भावे यांच्या 'स्वराज्यशास्त्र' या छोट्याशा पुस्तिकेतून ती आपल्यासमोर येते. विनोबाजी मांडतात, 'व्यवस्था स्थापण्याचे तीन स्वाभाविक प्रकार होतील-

१) एकायतन - कोण्या एका समर्थ पुरुषाने सर्वांची व्यवस्था पहावी.

२) अनेकायतन - अनेक समर्थ पुरुषांनी एकत्र होऊन सर्वांची व्यवस्था पहावी.

३) सर्वायतन - सर्वांनी मिळून, समान




जबाबदारीनं आपली व्यवस्था करून घ्यावी.

त्यांनी मांडलेली 'सर्वायतन' ही कल्पना मानवी समाजाच्या नव्या टप्प्याची जणू नांदीच म्हणावी लागेल अशी आहे.

'सर्वायतन' या संकल्पनेनुसार एका छोट्या गावात प्रयोग करून पहावा असं मोहनभाऊंनी ठरवलं. ज्या गावात सर्वसहमतीनं निर्णय घेतले जातात अशा गावांचा त्यांनी शोध घेतला, त्यासाठी पासष्ठ गावांचा अभ्यास केला. मानव बचाव आंदोलनात त्यांची देवाजी तोफांशी ओळख झाली. त्या सुमारास देवाजी मेंढा गावचे सरपंच म्हणून काम पाहत होते. मेंढा गावाने मोहनभाऊंच्या अभ्यासात सहभागी व्हायचा निर्णय घेतला. अभ्यासातून असे लक्षात आले की सर्वसहमतीने निर्णय घेतले जात असले तरी लोकशक्ती प्रकट झालेली दिसत नाही कारण - महिलांचा निर्णयात सहभाग नाही, निर्णयापूर्वी अभ्यास होत नाही आणि दारूचे मोठे प्रमाण. वनहक्कासाठी पुरुषांना महिलांचा सहभाग हवा होता, त्यासाठी दारू बंद करण्याची अट सर्वसहमतीने मान्य झाली. गोटुलची लढाई याच दोन वर्षांच्या कालावधीत झाली. पुढे आणखी पाच वर्षं मोहनभाऊंनी याच गावात 'आपणच आपला मार्ग शोधूया' या पद्धतीनं लोकांना विचारप्रवृत्त करण्याचं काम केलं. सुरुवातीला दीड वर्षं ते इथंच राहिलेही. मोहनभाऊ, त्यांची मित्रमंडळी, देवाजी आणि संपूर्ण गावानं सामंजस्यानं आणि अभ्यासपूर्वक केलेल्या प्रदीर्घ प्रयत्नांतून, सुरुवातीला वर्णन केलेलं मेंढा गाव उभं राहिलेलं आहे.

या कामामागची विचार-प्रक्रिया मला जेवढी समजली ती आपल्यासमोर मांडण्याचा प्रयत्न करत आहे.

## १) सर्वसहमतीनं निर्णय-प्रक्रिया

मेंढा गावात एखादा निर्णय पक्का होण्यासाठी गावातील सर्वांची सहमती मिळणं आवश्यक असतं. संसदीय लोकशाहीत बहुमतानं निर्णय घेण्यामुळे अनेक प्रश्न निर्माण होतात. निर्णय झाल्याक्षणीच निर्णयाच्या बाजूचे लोक आणि त्याच्या विरोधी लोक असे दोन तट पडतात. विरोधी गट सातत्यानं निर्णयाच्या अंमलबजावणीत अडथळे निर्माण करण्याचा प्रयत्न करतात, किंवा तटस्थ राहतात. त्यामुळे सतत हार-जीत, माणसांचा वापर करणं, कुरघोडी करणं अशा हिंसक प्रवृत्ती उफाळून येतात. मतमोजणी करून निर्णय घेण्यातला वेळ या बहुमतपद्धतीत जरी वाचला तरी अंमलबजावणी मात्र वर्षानुवर्षं रखडू शकते.

सर्वसहमतीनं झालेल्या निर्णयाप्रती सर्वांची बांधिलकी असते. निर्णय घ्यायला जरी वेळ लागला तरी अंमलबजावणी सोपी होते, कारण तिथं एकदिलानं काम होतं. सर्वसहमतीनं काम करण्याकरता सामंजस्याची फार गरज असते. प्रस्ताव मांडणाऱ्यानं विरोधी गटाची भूमिका समजावून घ्यायला लागते. तसंच विरोध करणाऱ्यांनीही विरोधासाठी विरोध न करता, 'ही चर्चा सर्वांच्या भल्याचा पर्याय शोधण्याकरता सुरू आहे' हा विश्वास मनात सदैव ठेवणं आवश्यक असतं. समजा, मांडलेल्या प्रस्तावाला एखाद्याचा विरोध असेल, तर त्याच्यावर विरोधामागची कारणं सांगण्याची तसंच इतर सकारात्मक पर्याय सुचवण्याचीही जबाबदारी असते.

सर्वसहमती साधायची असेल तर समान मूल्यांना गटातील सर्वांची मान्यता हवी. आपलं म्हणणं सर्वांसमोर स्पष्टपणे मांडता यावं यासाठी गटातील प्रत्येकाची संवादकौशल्यं विकसित व्हायला हवीत. गटात मागं राहणाऱ्यांनी पुढं यावं यासाठी इतरांनी मदत करायला हवी. 'सर्वसहमतीची निर्णय प्रक्रिया' या पुस्तिकेत मोहनभाऊंनी या विषयावर फार छान मांडणी केली आहे. आजच्या बहुमतावर आधारित लोकशाहीत सौदेबाजी वा दबावामुळे मतं वळवली जातात. सर्वसहमतीमध्ये मात्र, सर्वांना मान्य होतील असे सर्जनशील पर्याय निघावेत यासाठी प्रयत्न केले जातात. आपल्याला पटलं नाही, तरी तडजोड करणं अभिप्रेत नाही. मात्र सर्वांच्या हिताच्या

भूमिकेसाठी प्रसंगी स्वत:चा स्वार्थ बाजूला ठेवूनही समन्वयाची भूमिका आवश्यक आहे. बहुमताच्या निर्णयप्रक्रियेत स्पर्धा आहे, त्यामुळे तिथे संघर्ष अपरिहार्य आहे. सर्वसहमतीच्या प्रक्रियेत मात्र विकासाची दिशा पक्की आहे. या पुस्तिकेत 'सर्वसहमतीच्या निर्णयप्रक्रियेसाठी रचना कशी असावी?' या संदर्भात मांडणी केलेली आहे.

निर्णय घेण्यासाठी समूहातील सर्वांची एकत्र बैठक घेतली जाते. प्रत्येक घरातील एक स्त्री आणि एक पुरुष या बैठकीत सहभागी होतात. बैठकीतील चर्चा विस्कळित होऊ नये, मुद्देसूद व्हावी यासाठी एका समन्वयकाची सर्वानुमते नेमणूक होते. समूहातील एका व्यक्तीकडे नोंदी ठेवण्याची जबाबदारी देण्यात येते. एका व्यक्तीकडे 'वातावरण निरीक्षणाचे' काम देण्यात येते. हा निरीक्षक समूहाच्या भावना आणि सहभागाच्या पद्धती यांचं निरीक्षण करून टिप्पणी करतो. काही कारणानं वातावरण तापत तर नाही ना किंवा काहींच्या आक्रमक सहभागानं इतर लोक मागं तर राहत नाहीत ना अशा गोष्टींकडे लक्ष देणं हे या निरीक्षकाचं काम असतं.

चर्चा सुरू झाल्यानंतर पहिल्या टप्प्यात प्रस्तावांची मांडणी होते. दुसऱ्या टप्प्यात प्रत्येकजण स्वत:चे दृष्टिकोण मांडतो. तिसऱ्या टप्प्यात प्रस्तावावरील शंकांची नोंद घेतली जाते. या चर्चेचा असा नियम आहे की हे तीन टप्पे पूर्ण होईपर्यंत मध्ये कुणीही टीका-टिप्पणी करायची नाही. नाहीतर काही लोक मागं जातात, गप्प होतात. नंतर मात्र एकेक शंका समोर घेऊन मूळ प्रस्तावाच्या संदर्भात सर्वांगीण चर्चा केली जाते.

या चर्चेनंतर कुणाच्याही शंका नसतील तर समन्वयक निर्णय जाहीर करतो. अशा पद्धतीनं निर्णय झाल्यानंतर अंमलबजावणीतही जास्तीतजास्त लोकांचा सहभाग घेता येईल अशी रचना असते.

## २) गाव-समाजाची घट्ट बांधणी

सर्वायतनमध्ये व्यक्तीचं मत प्रमाण न मानता गाव-समूहाचं, यालाच आपण समाजगट म्हणूया, मत महत्त्वाचं मानलं जातं. गाव-समाजाचा आकार हाही इथं महत्त्वाचा मुद्दा आहे. असा समाजगट साधारणत: तीनशे ते पाचशे लोकसंख्येचा असावा. हाकेच्या अंतरावर घरं असलेल्या गाव अथवा मोहल्ला अथवा वस्तीत असे गट बनू शकतात. या समूहगटातल्या प्रत्येक घरातील एक स्त्री आणि एक पुरुष समूहगटाच्या निर्णयप्रक्रियेत सहभागी होतात.

सध्याच्या संसदीय लोकशाही पद्धतीमध्ये प्रत्येक व्यक्तीचं मत मोजलं जातं. वाळूच्या कणांप्रमाणे ह्या व्यक्ती सुट्ट्या असतात. या सुट्ट्या कणांच्या पायावर उभी राहिलेली लोकशाहीची इमारत मजबूत नसते. सर्वायतन पद्धतीनुसार एका छोट्या समाजगटाचं मत सर्वसहमतीच्या सामंजस्यामधून आकार घेतं. या प्रक्रियेतून एकसंध असा गाव-समाज निर्माण व्हायला मदत होते. अशा समाजगटाच्या मताची-निर्णयाची ताकद एकेकट्या व्यक्तीच्या मतापेक्षा कितीतरी पटीनं जास्त असते. निर्णयात समरसतेनं सहभागी असलेल्या समाजाच्या पायावर उभी राहिलेली लोकशाही खऱ्या अर्थानं मजबूत होते.

## ३) स्वेच्छापूर्वक आणि ज्ञानपूर्वक सहकार्य

मेंढा गावाच्या निर्णयप्रक्रियेत आणि निर्णयांच्या अंमलबजावणीत, म्हणजेच गावाच्या विकासात प्रत्येकाचं सहजस्फूर्त सहकार्य असतं. प्रत्येकाच्या क्षमतेनुसार, ताकदीनुसार ती व्यक्ती सहभाग घेते. मोहनभाऊंनी मेंढ्यात काम सुरू करायच्या आधीपासूनच मेंढ्यात सर्वसहमतीची निर्णयप्रक्रिया अस्तित्वात होती. सर्वांचं आपण होऊन सहकार्यही होतं, मात्र त्यामध्ये अडचणी होत्या. महत्त्वाचं म्हणजे हे सहकार्य 'ज्ञानपूर्वक' नव्हतं! ज्ञानपूर्वक म्हणजे, ज्या मुद्यांसंदर्भात निर्णय घ्यायचा असेल तो त्या त्या परिस्थितीसह, सर्व बाजूंनी विचारपूर्वक समजून घेऊन निर्णय घेणं आणि त्यानुसार कृती करणं.

लोकांच्या शहाणपणावर, म्हणजेच स्वत:चा मार्ग स्वत: शोधून काढण्याच्या क्षमतांवर विश्वास ठेवून मोहनभाऊंनी हे प्रश्न हाताळले. निर्णयप्रक्रियेत अनेकदा माहितीवाचून अडल्यासारखं होतं. सरकारकडून आपला हक्क मिळवायचा तर कायद्याची माहिती हवी, सरकारी प्रक्रियांची माहिती हवी. प्रश्न नीट समजून घ्यायचा, तर असं घडण्यामागील कारण आणि त्यामुळे झालेले परिणाम साकल्यानं समजून घ्यायला हवेत. लोकांना हे करणं जमावं यासाठी भावनांवर ताबा ठेवून, शांतपणे विचारविनिमय करण्याची सवय अंगी बाणणं गरजेचं असतं. ह्या दृष्टीनं इथले लोक सक्षम व्हावेत याकरता मोहनभाऊंनी मेंढ्यात अभ्यासगट तयार करण्यासाठी प्रयत्न केले. कुठल्याही समूहात, काही लोकांना विचार करून शोध घेण्याची आवड असते. अभ्यासात रस असतो. अशा व्यक्तींनी एकत्र येऊन हे अभ्यासमंडळ बनवलं. या अभ्यासमंडळात, गावाच्या विकासात ज्यांना रस आहे असे गावाबाहेरचे काही सहयोगी मित्रही सहभागी झाले. निर्णयप्रक्रियेत जिथं अडथळे येतात तिथं अभ्यासगटाचं काम सुरू होतं. अभ्यासगट या अडथळ्यांचा अभ्यास करून, तो ग्रामसभेत मांडतो. एक काळजी मात्र घेतली जाते, अभ्यासगटात कुठलेही निर्णय होत नाहीत. या अभ्यासाचा संदर्भ घेऊन




ग्रामसभेत निर्णय घेतले जातात. तिसरा टप्पा कृतीचा असतो. निर्णयांची अंमलबजावणी कशी होईल, हेही ग्रामसभेतच सर्वसहमतीनं ठरवलं जातं. कृतीपातळीवर गावाबाहेरील व्यक्तींचीही मदत घेतली जाऊ शकते.

ज्ञान, निर्णय आणि कृती अशी ही चक्रीय प्रक्रिया कुठूनही सुरू झाली तरी तिचं चक्र पूर्ण होतं आहे ना इकडे लक्ष द्यावं लागतं. या रचनेमुळे लोकांमधील अनेक क्षमता विकसित होण्यासाठी संधी मिळते, अभ्यासवृत्ती वाढते, शोध घेण्याचे प्रयत्न होतात. कुणावरही अवलंबून न राहता आपण आपला मार्ग शोधू शकतो हे सर्वांच्याच लक्षात येतं. औपचारिक शिक्षणाची पार्श्वभूमी नसली तरी आपण विचारपूर्वक आपलं मत मांडू शकतो, त्या मताला महत्त्व आहे, याची जाणीव प्रत्येकाला होते. त्यामुळे आत्मविश्वास मिळतो.

पालकनीती/१६ डिसेंबर २०१३
Posted at Marketyard PSO, Pune 411037.
on 16th of each month,

RNI No. MAH MAR 2001/4166
Registered No. PNCW/M-50/2012-2014

ही रचना वस्ती, मोहल्ला, सोसायटी किंवा संस्था, शाळा, वर्ग अशा कुठल्याही समूहाला सक्षम होण्यासाठी उपयोगी ठरू शकते, म्हणून इथे एवढ्या विस्तारानं मांडली आहे.

## ४) अहिंसेचं अधिष्ठान

मेंढ्यात गटांमध्ये होणाऱ्या चर्चा, मतभेद, संघर्ष यांचा सोक्षमोक्ष अहिंसेच्या मार्गानं लावला जातो. तसंच सरकारी अधिकारी, व्यापारी अशा गटाबाहेरील रचनांबरोबर होणारं प्रत्येक काम, संघर्ष हाही अहिंसात्मक मार्गानंच व्हायला हवा असा आग्रह धरला जातो.

अहिंसा म्हणजे निष्क्रिय राहणं नाही. माघार घेणं, सहन करणं किंवा तडजोड करणंही नाही. 'स्वराज्यशास्त्र' या पुस्तिकेत विनोबाजींनी अहिंसेचा अर्थ फार मार्मिकपणे मांडला आहे– ''समाजात चार प्रकारचे लोक असतात. सामान्यजन, सज्जन, महाजन आणि दुर्जन. दुर्जनांशी लढायचं तर जन, सज्जन आणि महाजन कोणालाच उदासीन राहून चालणार नाही. जन दुबळे पडले, सज्जन उदासीन झाले आणि दुर्जनांचा प्रतिकार करण्याची जबाबदारी केवळ महाजनांवर येऊन पडली की हिंसेला हिंसेनं टक्कर देण्यापलीकडं त्यांना दुसरं काही सुचू शकत नाही. पण जन, सज्जन आणि महाजन तिघंही एकत्र आले, तर दुर्जन कितीही संघटित असले तरी त्यांच्याशी अहिंसेनं टक्कर देणं अशक्य नाही. अहिंसेत दुर्जनांची दुर्जनता छेदण्याची सोय असते. लढायची तयारी अहिंसेमध्येही असावी लागतेच. अहिंसात्मक मार्गात प्रतिपक्षाच्या केसालाही धक्का न लावता आत्मक्लेशाची किंवा प्रसंगी शांत प्राणापर्णाचीही तयारी ठेवावी लागते.''

१९८७ पासून मेंढा गावानं सरकारबरोबर, ठेकेदारांबरोबर अनेकवार संघर्ष केले, लढे लढले. मात्र अहिंसेच्या मार्गानंच स्वत:चे हक्क प्राप्त करून घेतले. उदाहरणार्थ, वनहक्क कायद्यानुसार असलेल्या वन-व्यवस्थापन आणि वनोपजाच्या उत्पन्नाचा अधिकार मिळवण्यासाठी मेंढावासीयांना २००८ पासून २०११ पर्यंत प्रदीर्घ लढा द्यावा लागला.

तसंच, कधी गावातही दोन गटांमध्ये संघर्ष झाले. दारूमुक्तीसाठीच्या लढ्यात दारू बनवणारे आणि पिणारे एका बाजूला, तर दारूला विरोध करणारे दुसऱ्या बाजूला असे दोन गट पडले होते. मात्र प्रत्येक लढ्याचा शेवट समन्वयाने सकारात्मक मार्ग शोधून तशी कार्यवाही होण्यात झाला, ही गोष्ट महत्त्वाची.

## ५) सक्षम आणि जनसेवेला वाहिलेलं नेतृत्व

सर्वायतन यशस्वी होण्यासाठी ही कसोटी फार महत्त्वाची आहे. मेंढ्याला देवाजी तोफांसारखं सक्षम नेतृत्व लाभलं आणि मोहनभाऊंसारखी तळमळीनं आणि अभ्यासवृत्तीनं काम करणारी व्यक्ती सहयोगी मित्र म्हणून उपलब्ध झाली, हे मेंढ्याच्या यशाचं फार मोठं गमक आहे.

## ६) सर्वांच्या प्रामाणिक परिश्रमांची नैतिक व आर्थिक किंमत समान हवी

आज बौद्धिक श्रमांची किंमत आणि शारीरिक श्रमांची किंमत समान मानली जात नाही. शारीरिक श्रमांना कमी लेखलं जातं. त्यामुळे आर्थिक विषमता फोफावते. प्रचंड प्रमाणात खाजगी मालमत्ता तयार होते. सर्वायतननुसार सर्वांच्या प्रामाणिक परिश्रमांना समान किंमत मिळायला हवी. विषमतेवर आधारित आजच्या रचनेत हा फार मोठा धक्का वाटू शकतो. मात्र मेंढ्यानं हे साधावं, यासाठी खूप प्रयत्न केले आहेत. या वर्षीच मेंढ्यामध्ये सर्वसहमतीनं ग्रामदानाचा निर्णय झालेला आहे. ग्रामदान या संकल्पनेत गावातील सर्व जमिनीची मालकी गावाची असते. वैयक्तिक मालकी राहत नाही. या जमिनीपैकी पाच टक्के जमीन गाव भूमिहीनांना देण्यासाठी वेगळी काढून ठेवतं. वंशपरंपरेनं आपल्या वाट्याची जमीन कसण्याचा अधिकार प्रत्येकाला आहे. परंतु पिकवलेल्या उत्पन्नाचा अडिच टक्के वाटा गावाच्या धान्यकोषाला देणं आवश्यक असतं. जमिनीच्या खरेदी-विक्रीचा अधिकारही व्यक्तींना दिलेला नाही. गावानंच हा निर्णय घ्यायचा असतो. ग्रामदानाच्या निर्णयापर्यंत सर्वसहमतीनं येणं, मेंढ्यालाही सोपं नव्हतं. अनेक वर्ष या मुद्यावर चर्चा होत राहिल्या. सर्वसहमतीसाठी वाट पाहिली गेली. अखेर २०१३ मध्ये ग्रामदानाचा निर्णय झाला. इतके दिवस मेंढा, लेखा आणि कान्हारटोला अशा तीन गावांची मिळून ग्रामपंचायत होती. आता 'मेंढा' गावाला स्वतंत्र ग्रामपंचायतीचा दर्जा मिळेल. त्यामुळे गावाच्या विकासाला आणखी गती मिळेल.

मेंढ्यातील माणसं जगावेगळी नाहीत, असामान्यही नाहीत, पण सातत्यानं आणि निष्ठेनं प्रयत्न करत मेंढ्यानं आपल्यासमोर एक आदर्श घालून दिलेला आहे. अहिंसा, सर्वसहमती, लोकशक्तीचे सक्षमीकरण अशा, आता कालबाह्य वाटणाऱ्या, गांधीविचारांवर आधारित रचनेचं प्रत्यक्ष उदाहरण मेंढ्यानं आपल्यासमोर ठेवलंय. मानवजातीच्या शाश्वत विकासाचं स्वप्न यशस्वी व्हायचं असेल तर कोणत्या मार्गानं जायला हवं, हेही या उदाहरणानं आपल्या समोर ठेवलं आहे. सर्वांच्या हिताची तळमळ, अभ्यासाची तयारी आणि सामंजस्य एवढ्या किमान गोष्टी सर्वांनी स्वीकारल्या तर कोणत्याही गटामध्ये, संस्थेमध्ये, चळवळीमध्ये, वस्ती-मोहल्ल्यामध्ये, कुठेही यापद्धतीनं काम करणं शक्य आहे. खरं तर तसं होणं आजच्या काळात फार गरजेचं वाटतं आहे.

■ ■ ■

ईमेल : **shubha_kh@yahoo.co.in**

**संदर्भ –**

१) हिंद-स्वराज्य-महात्मा गांधी
२) स्वराज्य-शास्त्र-विनोबा भावे
३) गोष्ट मेंढा गावाची-मिलिंद बोकील
४) सर्वसहमतीची निर्णयप्रक्रिया – संपादक, मोहन हिराबाई हिरालाल
५) मेंढा (लेखा)-गाव-समाजाची थोडक्यात ओळख-मोहन हिराबाई हिरालाल
६) स्वशासनाची दिशा-मोहन हिराबाई हिरालाल